*वसन्त कानेटकर यांचें साहित्य*

**घर** १९५०

**पंख** १९५३

**पोरका** १९५६

शिवाय

**तेथें चल राणी**

(सार्त्रच्या 'The Chips Are Down' ह्या कादंबरीचा अनुवाद)

प्रकाशक :
ग. रा. भटकळ
पॉप्युलर बुक डेपो
लॅमिंग्टन रोड, मुंबई ७

प्रथमावृत्ति
भाद्रपद १८७९
सप्टेंबर १९५७

वेष्टन छायाचित्र :
डॉ. मो. वा. कानिटकर

सजावट :
प्रभाकर गोरे

मुद्रक :
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४

ती. ताईमावशी

ऊर्फ

श्री. लक्ष्मीबाई अध्यापक

यांना

कृतज्ञतापूर्वक

# निवेदन

'वेड्याचं घर उन्हांत' हें माझें पहिलेंच नाटक. अभिनय आणि रंगभूमी हा लहानपणापासून माझा खास जिव्हाळ्याचा विषय आहे. माझ्या आई-वडिलांनीं मला वेळोवेळीं दिलेल्या प्रोत्साहनामुळें आणि माझ्यावर केलेल्या संस्कारामुळेंच नाटकाबद्दलची माझी रुचि आणि दृष्टि थोडीफार विकसित होत गेली. शालेय आणि महाविद्यालयीन जीवनांत नट होण्याच्या महत्त्वाकांक्षेनें मीं रंगभूमीवर अक्षरशः आक्रमण केलें होतें. महाविद्यालयीन काळांतहि नभोवाणीवर लहानसहान नाटुकल्या लिहिण्याचा उपद्व्यापहि मीं कांहीं कमी केला नव्हता. पण लेखक म्हणून मला थोडीफार मान्यता मिळाली ती मात्र कादंबरीच्या क्षेत्रांत.

मानवी सुखदुःखांची सूक्ष्मता, स्वभावांतील अन्तर्विरोध, आणि जीवनदर्शनांतील भेदकता इत्यादि गुणांचा कादंबरीसारख्या साहित्यप्रकारांत जितका सहजसुंदर आविष्कार करतां येतो, तसा नाटकांत करतां येत नाहीं अशी माझी आजवर (गैर)समजूत होती. श्रेष्ठ पाश्चात्य आणि पौर्वात्य नाट्यकृति वाचून प्रसन्न झालेलें माझें मन वर्तमानकालीन मराठी रंगभूमी बघून अनेकवार रुष्ट आणि नाराज होत होतें. रंगभूमीवर यशस्वी होऊं इच्छिणाऱ्या नाटककारानें, तांत्रिक मर्यादा, नाट्यव्यवसाय आणि प्रेक्षकांची अभिरुचि यांच्याशीं तडजोड केलीच पाहिजे—या प्रत्ययानें नाटक लिहिण्याची माझी दुर्दम्य इच्छा माघार घेत होती. अनेक नाट्यकथा मनांत रुजाव्यात, फुलाव्यात आणि मग 'तो प्रांत आपला नव्हे' अशी मनाची समजूत घालून त्या बाजूला साराव्यात असें पुष्कळ वेळां घडत होतें. म्हणूनच मला वाटतें, 'पंख' सारखी कथा, नाटकाला अधिक अनुकूल असतांहि मी त्या कथेची कादंबरी करून मोकळा झालों. इतकेंच काय, पण अगदीं अलीकडे 'वेड्याचं घर उन्हांत' या कहाणीनें माझें मन भारून टाकल्यावरदेखील ही कथा कादंबरीच्याच रूपांत सादर करण्याचा माझा आटापिटा चाललेला होता. कादंबरीच्या चौकटींत कथा बसत नव्हती आणि नाटक लिहिण्याची माझी तयारी नव्हती. धड नाटक नव्हे, धड कादंबरी नव्हे, असे कांहीं भाग मी लिहीत होतों आणि पुन्हा पुन्हा फाडीत होतों.

अशा स्थितींत गेल्या वर्षी मे महिन्यांतील एका संध्याकाळीं अगदीं अकल्पित योगायोगानें प्रा. भालबा केळकरांची आणि माझी गांठ पुण्याला डेक्कन जिमखान्यासमोर रस्त्यावर पडली. फर्ग्यूसन कॉलेजमध्यें सुमारें अठरा वर्षांपूर्वी असतांना भालबांच्या समवेत 'खडाष्टक' या नाटकांत मीं एक भूमिका केली होती. त्यावेळचा आमचा स्नेह मध्यंतरींच्या प्रदीर्घ कालांतरानें जवळ जवळ बुजल्या-सारखा झाला होता. त्यावेळचा सडसडीत अंगयष्टीचा, टपोऱ्या पाणीदार डोळ्यांचा आणि तेजस्वी पण गोड स्वभावाचा हा नाट्यवेडा मुलगा, अचानकपणें आपल्या प्रौढ स्वरूपांत, एका मान्यवर कॉलेजांतील प्राध्यापक म्हणून आणि प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन् सारख्या एका ध्येयवादी हौशी कलावंतांच्य संस्थेचा निर्माता म्हणून माझ्यापुढें उभा राहिला होता. बोलण्याच्या ओघांत भालबांनीं माझ्याकडे नाटकाची मागणी केली, आणि त्याच क्षणीं मला 'वेड्याचं घर उन्हांत'ची आठवण झाली. भीतभीतच मीं त्यांना 'नाटका'सारख्या तोंडावळ्याचें कांहींतरी माझ्याजवळ आहे असें सांगितलें. आमची रस्त्यावरली मुलाखत तिथेंच संपली. बहुधा नाटक लिहिण्याच्या माझ्या संकल्पालाहि तिथेंच पूर्णविराम मिळाला असता. पण दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं अगदीं अचानकपणें भालबा माझ्या निवासस्थानीं येऊन दाखल झाले. मग मीं लिहिलेले अर्धवट भाग आणि कथेचा सांगाडा त्यांच्यासमोर मांडण्याखेरीज मला गत्यंतरच नव्हतें. भालबांनीं माझी कथा ऐकली आणि हें नाटक मीं तावडतोब पुरें करण्यासाठीं घ्यावें अशी मला आग्रहाची प्रेमळ सूचना केली. नाट्यकलेबद्दलचे त्यांचे विचार, कांहींतरी नवीन करण्याची त्यांची धडपड, तंत्राला, नाट्यव्यवसायाला, वा प्रेक्षकांच्या अभिरुचीला शरण न जाण्याचा त्यांचा हट्ट आणि रंगभूमीच्या परिसरांत यशस्वी दिग्दर्शक म्हणून त्यांनीं मिळविलेला लौकिक, या सर्वांचा माझ्या मनावर फार उत्साहवर्धक परिणाम झाला. त्याच दिवशीं एका नव्या उत्साहानें आणि उमेदीनें मी 'वेड्याचं घर उन्हांत' साकार करण्याच्या धडपडीला प्रारंभ केला.

या नाटकाची जन्मकथा मीं इतक्या सविस्तरपणें अशासाठीं सांगितली कीं केवळ नावीन्याचा हव्यास वा तंत्राचे काहीतरी चमत्कारिक प्रयोग करून प्रेक्षकांना दिपविण्याची इच्छा वा निरर्थक मनोविश्लेषणांतील पांडित्यप्रदर्शनाचा हेतु, मीं हें नाटक लिहितांना तिळमात्रहि मनांत बाळगलेला नाहीं. नाट्यकथेचा आशय वगळून त्यांतील तांत्रिक करामतीवर रसिकांनीं लुब्ध होऊं नये आणि टीकाकारांनीं

नाटकाच्या मूल्यमापनांत या तांत्रिक प्रयोगांनाच झोडपूं नये अशी मला नम्र पण आवर्जून विनंती करावीशी वाटते. 'तंत्रासाठीं तंत्र' वा 'प्रयोगासाठीं प्रयोग' ही कल्पना कलेच्या क्षेत्रांत मला साफ नामंजूर आहे. एका प्रबल कलात्मक अनुभवाच्या आविष्कारासाठीं मीं केलेली ही धडपड कितपत यशस्वी झाली आहे हें अजमावण्यास मराठी नाट्यप्रेमिकांची रसिकता समर्थ आहे याची मला खात्री आहे.

या नाटकाच्या लेखनांत आणि रंगभूमीवरील त्याच्या प्रयोगांत अनेकांचें साहाय्य मला उपकारक झालें आहे. या कथेची कादंबरी करण्याच्या फंदांत मीं न पडतां त्यावर नाटकच लिहावें असा आरंभापासून प्रेमळ आग्रह धरणारे माझे रसिकमित्र श्री. रामदास भटकळ, या नाटकाच्या वाचनानंतर त्यांत 'कांहीं वेगळेपणा आणि सामर्थ्य आहे' असें मला आवर्जून सांगून प्रोत्साहन देणारे, नाटककार ना. धों. ताम्हणकर, कवि कुसुमाग्रज, आणि पटकथाकार ग. दि. माडगूळकर आणि या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाचें अत्यंत मार्मिक निरीक्षण करून मला अतिशय उपयुक्त सूचना करणारे माझे स्नेही प्रा. अरविंद मंगरूळकर आणि श्री. श्यामकांत गोखले यांचा मी ऋणी आहें. प्रोग्रेसिव्ह ड्रॅमेटिक असोसिएशनच्या सर्व हौशी कलावंतांनींच हें नाटक रंगरूपाला आणलें. विशेषतः डॉ. श्रीराम लागूंच्यासारख्या प्रतिभासंपन्न कलावंतानें रंगभूमीवर आपल्या अतुलनीय सामर्थ्यानें जिवंत केलेले या नाटकांतील 'दादासाहेब', म्हणजे रंगभूमीच्या इतिहासांत एक अपूर्व अनुभव होय. या सर्वांचा मी मनःपूर्वक आभारी आहें.

प्रा. भालबा केळकर हे तर या नाटकाचे दिग्दर्शक. पण ते नुसते दिग्दर्शकच आहेत असें नाहीं. नटाप्रमाणेंच नाटककारहि घडविण्याचें कर्तृत्व त्यांच्या अंगीं आहे. या नाटकाच्या जन्मकाळीं त्यांनीं आपल्या प्रेमळ दक्षतेनें माझ्या अल्पगुणी लेखनशक्तीवर जे अमोलिक संस्कार केले त्याबद्दल मी कृतज्ञ आहें.

हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेज
नाशिक शहर
१ सप्टेंबर १९५७

—वसन्त कानेटकर

*

या नाटकाचा पहिला प्रयोग 'प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन'नें शनिवार दि. २४ ऑगस्ट १९५७ रोजीं रात्रौ ९ वाजतां पुणें येथील भानुविलास नाट्यगृहांत सादर केला.

*दिग्दर्शक : **प्रा. भालबा केळकर***

भूमिका :

| | | |
|---|---|---|
| दादासाहेब | . . | डॉ. श्रीराम लागू |
| दामोदरपंत }<br>खुळा दामू } | . | प्रा. भालबा केळकर |
| जीजी | . . | सौ. ताराबाई घारपुरे |
| शकू | . . | कु. उल्का लोकूर |
| बापू | . . | श्री. राम खरे |
| चंदू | . . | श्री. अरुण जोगळेकर |
| पंत | . . | श्री. जयंत धर्माधिकारी |
| रावजी | . . | श्री. श्रीधर राजगुरु |

संगीत : **श्री. बाळ माटे**

रंगभूषा : **श्री. निवृत्ति दळवी**

व्यवस्थापक : **श्री. श्रीधर राजगुरु**
**डॉ. सदानंद नाडकर्णी**

॥ १ ॥

*[चांदणीचे जमीनदार श्रीमान दादासाहेब ठाकूर यांच्या प्रचंड जुनाट वाड्यांतील एक दिवाणखाना. दिवाणखान्याच्या भिंतींना पोक आलें आहे. कांहीं ठिकाणीं पावसाच्या गळतीनें पोपडे सुटले आहेत. आणि तुळया खांब कमरेंत वाकले आहेत. खालच्या तेलपाण्याला जागायचें म्हणूनच कसेबसे घरधन्यावर छत धरून ते उभे आहेत.*

*दिवाणखान्याची सजावट—ना आधुनिक छानछोकीची, ना जुनाट खानदानीची. एकदोन काळ्या लाकडाच्या खुर्च्या, पेशवाई पद्धतीच्या बैठकीजवळ तिष्ठत उभ्या आहेत. ही पेशवाई बैठक ज्या गालिचावर बसली आहे तो गालिचा चांगला उंची मौल्यवान असावा. पण पांचपन्नास वर्षांची उमर झाल्यानें त्याचें रूप ओघळलें आहे. रंग उडालेल्या भिंतीवर आणि खांबावर तऱ्हतऱ्हेच्या तसबिरी लावलेल्या दिसतात. त्यामध्यें रविवर्माच्या जुन्या पौराणिक रंगीत तसबिरींच्या जोडीला, ठाकूरांच्या घराण्यांतील एकदोन उग्र पूर्वजहि लाकडी चौकटींत निमूटपणें बसले आहेत. समोरच्या एका खांबावर डोळ्यांत भरण्यासारखी जी दिसते, ती दादासाहेबांचे वडील कै. बडेभय्या यांची तसबीर. दुसऱ्या खांबावर लावलेल्या एका भल्यामोठ्या फोटोंत पांचवे जार्ज बादशहा राणी मेरीसमवेत काळाला न जुमानतां अजून शाही इतमामांत खडे आहेत. भिंतीलगत एकदोन विटक्या रंगाचीं कपाटें उभीं आहेत. एका कपाटाच्या दाराला प्रचंड सहाफुटी आरसा आहे. पण तोहि काळाच्या तडाख्यानें तडकलेला आणि आंधळा झालेला. समोरूनच एक जिना वर तिसऱ्या मजल्याकडे गेलेला दिसतो. जिन्याच्या पलीकडेच एक मोठी जुन्या पद्धतीची माहिरपीची खिडकी आहे. या दिवाणखान्यांत जें जें दिसतें आहे तें तें सारें जुनाट, रंगहीन, रूपहीन वार्धक्यानें ओघळलेल्या शरीरासारखें. विजेच्या बत्तीसारख्या कांहीं सुधारणासुद्धां अगदीं बळेंबळेंच या गांवाप्रमाणेंच या वाड्यांतहि घुसलेल्या दिसतात. दादासाहेबांच्या नांवामागे ‘श्रीमान’ हें विशेषण लावलें जातें. पण या विशेषणाला प्राप्त झालेली अवकळा या दिवाण-*

*खान्यांत पूर्णांशानें प्रतिबिंबित झालेली दिसते. या घरांतलीं माणसें कोणत्या काळांत वावरतात हें नक्की सांगणें फार कठिण आहे. नाहीं म्हणायला, गांधीजींच्या चित्राचें एक कॅलेंडर तेवढें या विरूप सजावटींत विसंगतीनें उठून दिसतें. परंतु त्याहि कॅलेंडरवर जानेवारीच्या पुढें काळ सरकलेला दिसत नाहीं.*

*संध्याकाळचे सात वाजले असावेत. बाहेर अंधारून आलें आहे. सोसाट्याचा वारा घोंघावत आहे. काळ्याकभिन्न ढगांचा गडगडाटहि कानावर येत आहे. मधूनच चमकणाऱ्या विजेच्या लोळांत समोरची महिरपी खिडकी उजळते. दिवाणखान्यांत सायंप्रकाश अजून रेंगाळत आहे. पण सांजवातीची वेळ टळून गेल्याचें बहुधा कोणाच्या ध्यानीं आलें नसावें. तिसऱ्या मजल्यावर तंबोऱ्याच्या साथींत बापूरावांची गाण्याची रियाज चालली आहे. त्या मधुर आर्त स्वरांनीं वातावरण भरून जाऊं लागतें.*

*पडदा वर गेल्यानंतर कांहीं वेळानें रावजी—या वाड्यांत वर्षानुवर्षे राबणारा एक नोकर—डोक्यावर होल्डाल आणि हातांत ट्रंक घेऊन आंतल्या दारानें प्रवेशतो व बाहेरच्या दारानें निघून जातो. क्षणभरानें रिकाम्या हातानीं तो परततो. या वेळीं परत आंत जात असतांना कशाला तरी तो ठेचकळतो. मग स्वतःशींच एक शिवी हासडून बटन दाबून तो दिवा लावतो. याच वेळीं सबंध दिवाणखाना उजळतो. दिव्याला तो नमस्कार करीत असतांनाच बाहेरून एका करड्या पुरुषी आवाजांत हाक ऐकूं येते—"रावजी—अरे रावजी..." त्याबरोबर "आलों आलों धनी–" असें प्रत्युत्तर देत रावजी लगबगीनें आंत पळून जातो. मग एक भलीमोठी अवजड पेटी डोक्यावर तोलून तो पुन्हा प्रवेशतो, आणि बाहेर जातो.*

*क्षणभरानें शकुंतला, भितऱ्या डोळ्यांची एक तरुण कोवळी मुलगी हातांत फराळाचा डबा घेऊन प्रवेशते. गडबडीनें ती दारापर्यंत जाते आणि थबकते. तिच्या मनांतलें मंथन तिच्या मुद्रेवरहि स्पष्ट उमटतें. ती माघारी वळते. जिन्यांतून दोन पायऱ्या वर चढून ती "बापू...अरे बापू..." अशा हाका दोनचार वेळां मारते. पण बापूरावांची गायनसमाधि भंग पावत नाहीं. अखेर ती खालीं येत हताशपणें स्वतःशींच पुटपुटते—*

*"...दादांची ती एक तऱ्हा, तर बापूचं हें दुसरं टोक...!" आणि मग लगबगीनें ती बाहेर जाते.*

*मग क्षणभरानें बाहेर गलबला ऐकूं येतो. कोणीतरी तणतणल्याचा, कोणी-तरी अजीजीनें समजूत घालीत असल्याचा आवाज येतो. कधीं स्फुट तर कधीं अस्फुट.*

*मघाच्याच करड्या पुरुषी आवाजांत—*

*"तूं आधीं या पेटींत भांडीकुंडीं भरलींसच का ! बोल—"*

*"पण रावसाहेब..." रावजी*

*"तुला हा नसता उपद्व्याप करायला सांगितला होता कोणीं ?"*

*"त्याचा कांहीं अपराध नाहीं त्यामधें काका —" शकुंतला.*

*"फार शेफारून गेलां आहांत तुम्ही नोकर लोक..."*

*"अहो पण शकूताई काय सांगते आहे तें तरी ऐकावं..." एका स्त्रीचा काकुळतीचा आवाज.*

*"कोणाचं कांहींएक ऐकायची गरज नाहीं आतां मला. या घरांतली एक फाटकी चिंधी कीं फुटकी तपेलीसुद्धां बरोबर न्यायची नाहीं मला. रावजी, उचल, उचल आधीं ती पेटी..."*

*"काकू, येवढा फराळाचा डबा तरी असूं दे बरोबर. तिथं पोंचायला अपरात्र व्हायची..." शकुंतला.*

*"यांना विचार बाई, पुरुषांचीं भांडणं आणि बायकापोरांचा मात्र वन-वास." मघाचाच स्त्रीचा आवाज.*

*"काय, काय विचारायचं आहे? बसा रे पोरांनो धमणीमधें..."*

*"काका, एवढा फराळाचा डबा..."—शकुंतला.*

*"फराळाचा डबा ! मला काय तूं माधुकरी समजलीस कीं भिकारी ?"*

*"तसं नव्हे काका—" शकुंतला.*

*"मग ! परत घेऊन जा तो डबा. या वाड्यांतल्या पाण्याचा थेंबसुद्धां वर्ज्य आहे यापुढं आम्हांला—! चल बस पाहूं तूं गाडीमधें..."*

*"एकदां जीजींना विचारून यायचं झालं असतं म्हणजे..." मघाच्या स्त्री आवाजांत विनवणी.*

*"तूं शहाणपणा शिकवूं नकोस मला. तोंड पाहायचं नाहीं मला कोणाचं. सगळे सारखेच ! चल रे...जाऊं दे गाडी..."*

*त्यानंतर गाडी दूर गेल्याचा आवाज ऐकूं येतो.*

*हा तंटा ऐकूं येऊं लागतांच जीजी, या वाड्याच्या प्रौढ मालकीणबाई, गडबडींत प्रवेशतात. कसल्याशा प्रक्षोभानें त्यांचे ओठ थरथरत आहेत. गडबडीनें त्या दारापर्यंत जातात. बहुधा बाहेर जाऊन तणतणणाऱ्या व्यक्तीची समजूत घालण्याचा त्यांचा विचार असावा पण दारापाशींच त्या थबकतात. क्षणभर विचार करतात. आणि निश्चयानें त्या मागें वळतात. कांहींतरी चाळा म्हणून दिवाणखान्यांतील आवराआवर त्या करूं लागतात. पण त्यांचें लक्ष सगळें बाहेर लागलें आहे हें उघड आहे. बाहेरचा आवाज वाढूं लागतो तशा अस्वस्थतेनं त्या खिडकीपाशीं जातात आणि डोकावून बाहेर दारापाशीं चाललेल्या प्रकाराचा अंदाज घेऊं लागतात. अखेर धमणी दूर गेल्याचा आवाज कानीं येताच त्या जिन्याकडे वळतात आणि हाक मारतात—"बापू...अरे बापू..."*

*तोंच रावजी मघाचीच अवजड टोपी डोक्यावर तोलून पुन्हा प्रवेशतो, आणि—]*

**जीजी :** *(जिन्याच्या पायरीवरच थबकून)* हें काय? ही पेटी तूं पुन्हा कां आणलीस घरांत?

**रावजी :** धाकट्या धनीसाहेबांचा हुकूमच जाला तवा मी काय करनार बाई? मुकाट्यानं गाडींत घातलेली ही प्येटी मला भाइर काडाया लागली.

**जीजी :** भावोजींनीं हुकूम केला? तो काय म्हणून?

**रावजी :** *(कष्टानें पेटी उतरवीत)* आतां पगा म्हंजी झालं! माझ्या अंगावरच वसकन् ओरडून धावले धाकले साहेब. मला म्हंगाले, 'तूं आधी या पेटींत भांडीकुंडी भरलीसच का? या घरांतली एक फाटकी चिंधी का फुटकी तपेलीसुद्धा बरोबर न्यायाची न्हाई. ठाउक नाहीं तुला? उचल, उचल, आधी ती प्येटी उचल!' मंग आतां मी तरी काय करनार बाई? उचलली!

**जीजी :** मीं हीं भांडीं दिलीं आहेत म्हणून सांगितलं नाहींस का तूं त्यांना?

**रावजी :** शकूताईनीच सांगितलं त्यांना लई समजाऊन.

**जीजी :** मग?

**रावजी :** ते ऐकतात होय ताईसाहेबांना ? रावसाहेबांचेच ते धाकले भाऊ. ते एकपट तापट माथ्याचे तर हे—

**जीजी :** *(डोळे वटारीत)* रावजी—

**रावजी :** तर काय बाई ? या वाड्यावर आमा गडीमानसांचा काळ कठिन आलया खरा. कुनाचं ऐकावं तें बी समजना. येकापुढं मान वाकवली की दुसरा बिगडलाच. येकदम् येकेरीवर येऊन मारहानीची भाषा.

**जीजी :** *(दरडावून)* हां हां, हे घरांत नसले कीं जीभ फार सैल सुटायला लागते हं तुम्हा नोकराची !

**रावजी :** *(मुकाट्यानें पेटी आंत ओढीत नेत, पण ऐकूं जाईलसें कुरकुरत)* आता आमचीच का हून ? समद्यांचीच म्हना ना...

**जीजी :** *(ताडकन् रागानें)* काय म्हणालास ?

**रावजी :** *(घाबरून)* काय नाय, काय नाय. *(दूर जात कुर्यात—)* रावसाब वाड्यावर असले की संमदा कशी ताटाखालची मांजरं.

**जीजी :** *(संतापानें)* रावजी, इतकी अक्कल वाढली का तुझी ? *(रावजी घाबरून पेटी घेऊन पसार होतो. बाहेरून शकुंतला प्रवेशते. तिच्या हातांत फराळाचा डबा आहे.)*

**शकू :** जीजी—

**जीजी :** गेले एकदा तुझे माधवकाका ?

**शकू :** गेले. करायचा तेवढा सगळा फार्स करून गेले ग काका !

**जीजी :** म्हणजे ?

**शकू :** हा फराळाचा डबा देखील नेला नाहीं त्यांनीं बरोबर.

**जीजी :** तें कां म्हणून ? आतां वाटेंत खाणार काय ? लहान मुलं आहेत बरोबर त्यांचा तरी विचार ? पुरुषांचीं भांडणं, आणि बायकामुलांचा मात्र...

**शकू :** पण जीजी, तूं कां नाहीं आलीस दारापर्यंत पोंचवायला ?

**जीजी :** कशाला यायचं ? आपलीच शोभा करून घ्यायला ना ?

**शकू :** असं कां म्हणतेस तूं ? तूं मुळीं सकाळपासून भाषणसुद्धां केलं नाहींस काकांशीं.

**जीजी :** शब्दाचा मान ठेवतात त्यांच्याशीं भाषण करायचं.

**शकू :** पण जीजी, काकांनीं तुला एक तरी दुरुत्तर केलं होतं का? जें काय झालं तें दादांनीं आणि त्यांनीं बघून घेतलं असतं.

**जीजी :** तें ठाऊक आहे मला. पण त्यांचं बोलणं मनावर घेऊं नका, झालं गेलं जेथल्या तेथें विसरून जा, असं परोपरीनं मी सांगत होतें, तें ऐकलं का त्यांनीं? बरं, जायचं होतं घर सोडून तर निदान हे वाड्यावर परत यायची तरी वाट बघूं नये भावोजींनीं?

**शकू :** तसं मात्र म्हणूं नकोस हं जीजी. दादा त्यांना काय काय बोलले तें आठव एकदा. तें बोलणं ऐकून मला सुद्धां रडायला आलं. माणसाला कांहीं स्वाभिमान आहे कीं नाहीं—असलं बोलणं ऐकून घ्यायला कोण राहील या घरांत?

**जीजी :** अग पण भावोजींना एकट्यालाच का बोलले ते? बापूला आणि चंदूला देखील कांहीं कमी रागें भरले नाहींत ते. मग त्यांना नाहीं वाटतं स्वाभिमान? ज्या माणसाला सर्वांचं करावं लागतं तेंच माणूस बोलतं बरं बाई शकू.

**शकू :** पुरे झालं. बापू आणि चंदू भीक तरी घालताहेत का दादांच्या रागावण्याला? थारामोऱ्याला सुद्धां उभे राहात नाहींत कोणी त्यांच्या. बापू एवढा पंचवीस वर्षांचा झालाय, पण तो पै तरी मिळवतोय का?

**जीजी :** त्यानं मुळीं स्वच्छच सांगून टाकलंय कीं माझं आयुष्य मी गाण्याला वाहिलंय म्हणून. मग माणसानं काय बोलावं?

**शकू :** बरं, चंदूदेखील कांहीं कांहीं लहान नाहीं आतां. जहागिरीचा कारभार बघायचा म्हणून कॉलेज सोडून तो घरीं राहिला.

**जीजी :** डोंबल. तो कसला दगडाचा कारभार बघणार? जहागिरीचा कारभार हें हें नुसतं निमित्त आहे. एकेका परीक्षेंत हा तीन तीन वेळां नापास होणार. खर्च परवडायला तरी नको का या दिवसांत?

**शकू :** त्या दोघांनाहि घरांतल्या परिस्थितीची कांहीं कल्पनाच नाहीं. आणि दादांचा तर सगळा धसमुसळा कारभार. मुलांना नुसतं बडव बडव बडवलं आणि जन्मभर अरेरावी गाजवली. त्याचा हा सगळा परिणाम आहे.

**जीजी :** तरी आतां वयोमानानं पुष्कळ निवळले मी म्हणतें. पूर्वीचे एकेक दिवस आठवले कीं अंगावर कांटा उभारतो माझ्या. अग, सोन्यासारखे पाठचे

चार भाऊ होते यांच्या. पण असल्या अरेरावीनं साऱ्यांना शत्रू करून घरांतून घालवून दिले.

**शकू :** *(विस्मयानें)* चार? चार कोठले? माधवकाका तर सर्वांत धाकटे आणि तिसरे ना?

**जीजी :** लौकिक दृष्टीनं तेच धाकटे आणि तिसरे. पण...*(घुटमळतात.)*

**शकू :** पण? पण काय?

**जीजी :** *(सुस्कारून)* ती एक मोठी कहाणी आहे. तुम्हां मुलांच्या जन्माच्या आधींची गोष्ट आहे ती. मी बापूच्या वेळीं बाळंतीण होतें तेव्हां दामोदरभावोजी घरांतून गेले.

**शकू :** दामोदरभावोजी? म्हणजे दामोदरभावोजी कोण?

**जीजी :** तुमचे काका.

**शकू :** *(चाकित होऊन)* आमचे काका? आणि आम्हांला कसं माहीत नाहीं? तूं कसं सांगितलं नाहींस? कोणीच कसं बोललं नाहीं?

**जीजी :** *(खिन्नतेनें)* कोण बोलणार नि काय सांगणार? हीं गृहछिद्रं म्हणजे मिरवायचीं भूषणं आहेत का?

**शकू :** कसलीं गृहछिद्रं? तूं बाई स्पष्ट स्पष्ट कांहीं तरी बोल. तुझ्या असल्या बोलण्यानं मला कांहीं समजत नाहीं.

**जीजी :** तुला म्हणून सांगतें, ऐक. पण यांच्यासमोर तो विषय कधीं काढूं नकोस हो? यांच्या मनाला खोलवर झालेली जखम आहे ती. त्याच वेळीं भ्रमिष्टासारखे झाले होते हे.

**शकू :** *(विस्मयानें)* म्हणजे? दादा भ्रमिष्टासारखे झाले होते?

**जीजी :** सगळाच विचित्र आहे तो प्रकार. *(सभोवतालीं कानोसा घेत)* दामोदरभावोजी यांचे पाठचे भाऊ. *(घुटमळत)* पण...तसे भाऊ नव्हते.

**शकू :** *(विस्मयानें)* तसे भाऊ नव्हते? म्हणजे?

**जीजी :** कसं सांगूं तुला म्हणजे समजेल? मामंजींच्याबद्दल कांहीं कानीं आलंय् का तुझ्या?

**शकू :** मामंजी म्हणजे बडेभय्याच ना? त्यांना गाण्याचा फार षोक होता का?

**जीजी** : तुला कोणीं सांगितलं?

**शकू** : बापू म्हणत असतो नेहमीं.

**जीजी** : मामंजींना केवळ गाण्याबजावण्याचा शोक होता असं नाहीं.

**शकू** : अगबाई! म्हणजे कसलं व्यसन तर—?

**जीजी** : गेलेल्या माणसाबद्दल वाईट बोलूं नये. पण सगळे नाद होते त्यांना. व्यसनापायीं कुबेरासारख्या जहागिरीला भिकेला लावायची पाळी आणली होती त्यांनीं.

**शकू** : खरंच? खरंच सांगतेस तूं?

**जीजी** : अगदीं खरं. सासूबाईंना कांहीं कमी छळलं नाहीं त्यांनीं. साध्वी होती बिचारी. नवऱ्याच्या आणि...आणि...त्यांच्या त्या बयेच्या खस्ता खाऊन झिजून झिजून मेली.

**शकू** : म्हणजे, बडेभय्यांनीं—?

**जीजी** : होय. कोणी गाणारीणच होती म्हणे. मेहेरजान का कायसंसं नांव होतं तिचं. मीं तिला कधींच पाहिली नाहीं. पण त्या बयेच्या पोटीं जन्माला आलेलं मूल म्हणजे दामोदरभावोजी, समजलीस?

**शकू** : आणि त्या मुलाला बडेभय्यांनीं आपल्या घरांत—?

**जीजी** : बडेभय्यांनीं नव्हे. त्यांची काय हिंमत होती यांच्यासमोर बोलायची? शेवटीं शेवटीं मामंजीदेखील यांना भिऊन भिऊन वागत होते. स्वतः यांनींच त्या बयेच्या मागं त्याला घरीं आणला आणि आपल्या भावंडांच्या बरोबरीनं वाढवला. पण यांचा गाण्याचा रागच दामोदरभावजींना देशोधडीला लावायला कारण झाला.

**शकू** : देशोधडीला? म्हणजे?

**जीजी** : भावोजी गाण्याचे जरा नादी होते. लहानपणीं यांच्या अपरोक्ष कोठूनतरी बांसरी वाजवायला शिकले ते. पण त्या बांसरीपायींच पुढं तो अनर्थ ओढवला ग बाई!

**शकू** : *(विस्मयानें)* अनर्थ? अनर्थ कसला?

**जीजी** : दामोदरभावजी पंधरा वर्षांचे असतील नसतील त्यावेळीं. पोरबुद्धीनं

एकच एक छंद घेऊन दिवसभर बांसरी वाजवीत असायचे ते. त्यावरूनच एकदां यांचा राग भडकला. भावोजींनीं कांहीं उलट उत्तर केलं. मग काय, यांचं रागावणं तें. चाबकानं त्या कोवळ्या पोराला यांनीं मरेमरेतों मारलं, आणि परसांतल्या पर्णकुटींत उपाशीं कोंडून घातलं.

**शकू** : अगबाई. आणि मग ?

**जीजी** : त्या रात्रींच भावोजी घरांतून नाहींसे झाले, ते पुन्हा कांहीं कधीं कोणाला दिसले नाहींत.

**शकू** : नाहींसे झाले म्हणजे ? त्यांचं झालं तरी काय ?

**जीजी** : काय झालं असेल देव जाणे !

**शकू** : पण मग त्यांचा शोध केला नाहीं का कोणीं ?

*(तेवढ्यांत बापूरावांची "बालमुवा तुम क्या जानो प्रीत" या ठुमरीची एक लकेर ऐकूं येते. जीजी नाकावर बोट ठेवून शकूला गप्प करतात. तेवढ्यांत दाणेदार तान घेत, हातवारे करीत, गाण्याच्या तंद्रींतच बापूराव तंबोरा घेऊन प्रवेशतात. बापूरावांचा पेहराव, सुरत, बोलणें चालणें गाण्याला वाहिलेल्या अवलियासारखें.)*

**बापू** : *(बडेभय्यांच्या तसबिरीखालींच खांबाला टेकून तंबोरा ठेवून छेडत)* कसलीं खलबतं चाललीं आहेत मायलेकींचीं ?

**जीजी** : खलबतं कसलीं ? तुझी गाण्यांतून केव्हां समाधि उतरते आहे याचीच वाट बघत होतों आम्ही.

**बापू** : आज सकाळीं आवाज इतका छान लागला होता म्हणतेस जीजी ! वा ! *(एक तान घेऊन तंबोरा शेजारीच उभा करून ठेवतो.)*

**शकू** : तें ओळखलंच आम्हीं. दादा गांवाला गेलेत असं पाहून तिसऱ्या मजल्यावर जेव्हां आपण मैफल थाटलीत, तेव्हांच मीं जीजीला म्हटलं की बापूला हाका मारण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**जीजी** : तंबोरा कशाला आणला आहेस इथं ? इथं जल्सा करायचा विचार आहे कीं काय आतां ?

**बापू** : इथं ? दादांच्या दिवाणखान्यांत ? काय बिशाद आहे माझी ? आम्ही आपले तिसऱ्या मजल्यावर आहोंत तें ठीक.

**जीजी :** हे घरांत नसले कीं गाणं गायचं, तें तिसऱ्या मजल्यावर, दारंखिडक्या लावून अगदीं बंदोबस्तानं रे कशाला बसावं लागतं ?

**बापू :** *(हसून)* अग माझ्या गाण्याचा घरांतल्या माणसांना उपद्रव कशाला ?

**जीजी :** *(डोळे मोठे करीत)* उपद्रव ?

**बापू :** उपद्रव नाहीं तर काय ? मीं सूर लावला कीं दादांचा कपाळशूळ उठतो. आज तरी दादा बावड्याला गेले म्हणून तंबोरा काढून बसलों होतों. दादा घरीं परत यायच्या आंत हा जिकडचा तिकडं पोंचता करावा म्हणून खालीं आणला.

**जीजी :** जिकडचा तिकडं ? म्हणजे कुठं ?

**बापू :** असाच एकीकडं.

**शकू :** *(हसून)* आम्हांला आहे माहीत ही ' एक ' कोण ती.

**बापू :** समजला बरं आपला शहाणपणा मावशीबाई.

**जीजी :** घरांत एवढा प्रकार चालला होता, तुला ऐकू आलं नाहीं का रे कांहीं ?

**शकू :** अग, घराला आग लागली तरी त्याची ब्रह्मानंदीं लागलेली टाळी उतरायची नाहीं.

**बापू :** *(हसून)* अग आमच्या शास्त्रांत संगीताला नाद-ब्रह्म म्हटलं आहे तें काय उगीच ? *(असें म्हणून बापूराव हातवारे करीत स्वतःशींच गुणगुणूं लागतात. कधीं स्फुट तर कधीं अस्फुट. पण आतां ही स्वारी बाह्य जग विसरली.)*

**शकू :** तुला मीं निदान दहा हाका तरी मारल्या.

**बापू :** *(तंद्रींतच)* असं का ? *(पुन्हा गुणगुणूं लागतो.)*

**शकू :** म्हटलं तूं तरी माधवकाकांना कांहीं सांगशील ?

**बापू :** *(उत्तरादाखल बापूराव तान घेऊन समेवर येतात आणि हातांनीं सम दाखवीत, टाळी वाजवून 'हो' करतात.)*

**शकू :** काकांनीं आमचं कोणाचं ऐकलं नाहीं. तस्से ते काकूला आणि मुलांना घेऊन निघून गेले.

**बापू :** (तंद्रींतच) अस्सं. *(पुन्हा एक तानेचें भेंडोळें.)*

**जीजी :** मीं दिलेला फराळाचा डबादेखील त्यांनीं बरोबर नेला नाहीं.

**बापू :** हां हां ! *(पुन्हा एक तान)*

**शकू :** आग्र्याला जातों म्हणाले. होय ना ग जीजी?

**बापू :** असं का, अरे वा! *(पुन्हा एक बोलतान)*

**जीजी :** *(चिडून)* "अस्सं, हां हां, अरे वा" मी काय तुला गोष्ट सांगतें आहे असं तुला वाटलं, होय रे?

**बापू :** *(दचकून भानावर येत)* आं? काय, काय? आग्र्याला गेले ना? छान छान.

**जीजी :** काय छान काय?

**बापू :** नाहीं म्हणजे, फराळाच्या डब्याची कांहीं जरुरी नव्हती.

**शकू :** फराळाच्या डब्याची जरुरी नव्हती?

**बापू :** आपले खांसाहेब आहेत तिथं. त्यांनीं केली असती सगळी व्यवस्था.

**जीजी :** जळ्ळा तुझा खांसाहेब.

**शकु :** काका काय आग्र्याला ताजमहाल बघायला गेले आहेत असं तुला वाटलं?

**बापू :** नाहीं का? मला आपलं वाटलं--

**जीजी :** डोंबल वाटलं तुला.

**बापू :** नाहीं आग्रेवाल्यांची ठुमरी म्हणजे मौज आहे मौज महाराज.

**शकू :** तुला ठुमरीशिवाय दुसरं कांहीं दिसतंय का?

**जीजी :** कांहीं सांगूं नकोस त्याला. माणूस गेलं म्हणून दुःखानं कोणीं हंबरडा फोडला याच्या कानाशीं, तर हा विचारील कीं "राग कोणता" म्हणून!

*(बापूराव पुन्हा ताना घेऊं लागतात. तेवढ्यांत मागील बाजूच्या खिडकींतून वीस वर्षांचा चंदू डोकावतो. टाळा वाजवून शुकू शुकू करून तो शकूला हांक मारतो.)*

**शकू :** *(दचकुन, मागें वळून बघत)* कोण? कोण, चंदू? हें रे काय?

**चंदू :** *(खिडकातूनच बसक्या आवाजांत)* शंख करूं नकोस ना माझे आई. इकडं ये. *(तिच्या हातांत बाहेरूनच आपल्या हातावर टाकलेला कोट देतो.)*

**शकू :** हें काय? *(चंदू नाकावर बोट ठवुन "शुकू" करतो. मग पायांतल्या*

*सँडल्स काढून तिच्या हातावर ठेवतो. मग तो खिडकींतून अलगद उडी मारून आंत येतो. इकडे तिकडे शोधक नजरेनें बघून मग तो खुणेनें आपल्या ओठावर मिशांचे आंकडे दाखवीत, शकूला "कोठें आहेत?" अशी खुणेनेंच पृच्छा करतो.)*

**शकू :** *(न समजून)* कोण? कोण हवं आहे तुला?

**चंदू :** *(नाटकीपणानें)* सद्धर्मप्रतिपालक औरंगजेब महाराज?

**जीजी :** *(रागानें)* चंद्या, गाढवा—

**चंदू :** *(वरमून)* अरेच्या, तूं इथंच आहेस का? मीं तुला पाहिलंच नाहीं. माफ कर बोवा. *(इकडे तिकडे पाहून अजमास घेत—)* पण तुम्ही सगळी मंडळी इतक्या खणखणीत आवाजांत उघडपणें बोलतां आहांत त्यावरून दादासाहेब कांहीं वाड्यावर आहेत असं वाटत नाहीं. होय ना ग शके?

**शकू :** दादा अजून बावड्याहून परत आले नाहींत.

**चंदू :** (खळखळून हसून, मोकळेपणानें) दॅट्स इट. वाटलंच मला. रस्त्यावरच्या कोपऱ्यावर मी आलों तेव्हांच माझ्या मनांत शंका आली, कीं अजून डरकाळ्या कशा ऐकूं आल्या नाहींत?

**शकू :** दादांच्या डरकाळ्या का रे? त्यांच्यासमोर असं बोलायची प्राज्ञा आहे का तुझी?

**चंदू :** अलबत्. मी काय भागूबाईसारखा दादांना घाबरतां असं समजलीस तूं?

**जीजी :** छे छे. मोठे पराक्रमी शिलेदारच आपण? म्हणूनच असा चोरासारखा खिडकींतून घरांत शिरलास वाटतं?

**चंदू :** चोरासारखा काय म्हणून? चांगला राजरोस पुढच्या फाटकांतून आलोंय. उगाच गडीमाणसांच्यासमोर तमाशा नको म्हणून आलो झालं खिडकींतून तीर्थस्वरूप माधवकाकांची बोळवण झालेली समजली, तेव्हां म्हटलं आधीं सुगावा घ्यावा कीं घरांत कोणत्या रसाचं संकीर्तन चाललंय?

**शकू :** माधवकाका भेटले तुला?

**चंदू :** भेटले म्हणजे? त्यांनाच तर सेंड ऑफ देऊन आलोंय मी.

**बापू :** *(गायनसमाधींतून मधेंच डोकें वर काढून)* सेंड ऑफ? हां हां, त्या आपल्या ह्यांना—

**चंदू :** हो हो त्यांनाच. आतां कांहीं काका घरीं परत येणार नाहींत.

**शकू :** अरे पण त्यांचं मन वळवायचा कांहीं प्रयत्न तरी केलास का ?

**चंदू :** छान! मी कोण मन वळवणार त्यांचं? दादासाहेबांनीं लोकांना शिव्या द्यायच्या आणि आम्ही मलमपट्ट्या घेऊन गांवभर हिंडायचं, हा धंदा सांगितला आहे कोणीं? आम्हांला कांहीं उद्योग आहेत कीं नाहींत?

**जीजी :** समजले आपले काय उद्योग चालले आहेत ते. कालपासून होती कुठं आपली स्वारी? कांहीं जेवायखायची तरी आठवण?

**चंदू :** बिझिनेस! उद्योग! कुठं म्हणजे? आमच्या तळावर. बैठकीच्या जागीं. काल रात्रींपासून केवढी मोठी बैठक भरली होती आमची?

**बापू :** *("बैठक" एवढाच शब्द ऐकून पुन्हा भानावर येत)* बैठक? तूं देखील होतास का कालच्या बैठकींत? वा! रोशन काल काय गायली आहे---

**चंदू :** *(हसून)* अहो महाराज, गाण्याची बैठक नव्हे, ब्रिजची बैठक.

**बापू :** असं असं, मला वाटलं....रोशनचा कालचा दरबारी कानडा ऐकायला हवा होता तुम्हीं लोकांनीं. जीव ओवाळून टाकावा असं वाटलं तिच्यावरून.

**चंदू :** तो तर आपण केव्हांच टाकलाय तिच्याव---*(एकदम जीभ चावतो.)*

**जीजी :** *(रागानें)* चंद्या, जिभेला कांहीं हाड आहे का तुझ्या? कोणाला काय बोलावं याचा कांहीं ताळतंत्र? बापू थोरला भाऊ आहे तुझा?

**शकू :** प्रत्यक्ष जन्मदात्या पित्याला जो मानत नाहीं तो इतरांचा काय मान ठेवणार?

**चंदू :** सॉरी! आमचं हें अस्सं होतं. *(पुटपुटत)* गांवभर ज्या गोष्टीची बोंब झाली आहे तिचा उल्लेखदेखील--

**जीजी :** काय म्हणालास?

**चंदू :** *(नाटकीपणानें, पंचम जॉर्ज आणि राणी मेरीच्या तसविरीकडे वळून, तसबिरीला उद्देशून)* आपलं राज्य गेलं आणि आमची ही अशी स्थिति झाली.

**जीजी :** घराचेच वासे फिरले तेव्हां कोणाला काय बोलायचं? *(वैतागानें)* घराण्याचा नांवलौकिक वाढविणारे एकापेक्षां एक छान कुलदीपक जन्माला आलां आहांत. कोणाचा तरी शापच आहे या घराला कीं---

*(बापूराव उठून जाऊं लागतात)*

**जीजी :** कुठं चालली आपली स्वारी ?

**बापू :** जरा त्या आपल्या...म्हणजे हा तंबोरा पोंचता करून येतों.

**जीजी :** रोशनकडं, होय ना ?

**बापू :** हूं. *(जाऊं लागतो.)*

**जीजी :** *(रागानें)* बापू—

**बापू :** *(शांतपणानें)* काय ?

**जीजी :** जायचं नाहीं तिकडं. मनाला येईल तसं वागायला कांहीं जिवाला वाटत नाहीं तुझ्या ?

**बापू :** काय वागलों बोवा मी ?

**जीजी :** काल पुन्हा गेला होतास तूं रोशनकडं ?

**बापू :** गाणं ऐकायला गेलों होतों मी.

**जीजी :** तें ठाऊक आहे मला. लोक तुझ्याबद्दल काय काय बोलतात तें ठाऊक आहे का तुला ?

**बापू :** लोक कोणाबद्दल कधीं चांगलं बोलले आहेत का ?

**जीजी :** याचे परिणाम चांगले होणार नाहींत हं. सांगून ठेवतें मी तुला. यांच्या कानावर अजून कांहीं गेलं नाहीं तोंपर्यंत—*(तेवढ्यांत बाहेरून दादासाहेबांची क्रोधाची गर्जना ऐकूं येते आणि त्यामुळें सर्व मंडळींची दाणादाण उडते.)*

**दादा :** *(आंतूनच)* हरामखोर! बदमाष! एकेकाच्या कमरेंत लाथा घालून हाकलून लावा...हुज्जत काय घालीत बसलास रावजी? फाटकांत उभं करायच्या लायकीचा नाहीं एकहि इसम. सांग, त्यांना चंदू भेटायचा नाहीं म्हणून. जुगार खेळण्याखेरीज धंदा नाहीं दुसरा...चुप. एक अक्षर बोलूं नका. रावजी, पुन्हा हे मवाली दारांत दिसले तर तुला चाबकानं फोडून काढीन. याद राख....

**चंदू :** *(पांचावर धारण बसून लटपट कांपत)* अरे बापरे. दादा...आमचे दोस्त...टोल नाक्यावरची मंडळी सांपडली वाटतं दादांच्या तडाख्यांत...तरी लेकाच्यांना सांगत होतों कीं सुगावा घेतल्याखेरीज वाड्यावर फिरकूं नका...

*(असें बोलत खुर्चीवरील कोट हिसकावून गडबडीनें खिडकींतून उडी मारून पसार होतो. दादांची गर्जना ऐकून शकूच्या हातांतील डबा धप्कन् खालीं पडतो, आणि ती थरथर कांपूं लागते. लगबगीनें जीजी तिला इशारा देत आंत घेऊन जातात. बापूरावांनी अगोदरच मागला पाय काढला आहे. तंबोरा मात्र बिचारा मागें तसाच उभा राहिला आहे. त्याला पाय असते तर बिचारा तोहि पाठीला पाय लावून पळाला असता. दादासाहेब संतापांतच हाक मारीत प्रवेशतात. पाठोपाठ पंत येतात.)*

**दादा :** *(आंतूनच ओरडून)* बापू, अग शकू ? अरे कोणी माणसं जिवंत आहेत कीं नाहींत या घरांत ?

*(शकू आंतूनच घाबऱ्या आवाजांत, "आलें, आलें..." अशी ओ देत धावत बाहेर येते. भेदरल्यामुळें कशाला तरी ती ठेचकाळून धडपडते आणि कांहींतरी पाडते. तोंच दादासाहेब प्रवेशतात.)*

**दादा :** धडपड ! तडफड ! सरळ चालतांदेखील येत नाहीं या कारटीला. *(घाबरून शकू थरथर कांपत उभी राहते.)* चंद्या कुठं आहे ?

**शकू :** *(भेदरून)* त...त...पप...चंदू...

**दादा :** *(खवळून)* ततपप काय करतेस ? मी विचारतों आहें, चंद्या कुठं आहे ?

**शकू :** *(भयभीत होऊन)* घ...घरांत नाहीं चंदू.

**दादा :** घरांत नाहीं ? मग आहे कुठं ? कोठले उकिरडे फुंकायला गेला आहे ?

**शकू :** मी...मी बघून येतें. *(असें म्हणून तेथून सटकते. तेवढ्यांत दादासाहेबांच्या नजरेला तंबोरा पडतो. तंबोऱ्यावर सूर छेडले जाऊं लागतात.)*

**दादा :** *(उसळून)* पुन्हा या घरांत तंबोरा ? याचा अर्थ काय ? कसली अशुभ चिन्हं दिसायला लागलीं आहेत आम्हांला ? आम्ही जिवंत असतांना राजरोस आमच्या घरांत तंबोरा ?

*(त्या मधुर स्वरनिनादानें वातावरण भरून जाऊं लागतें. जणूं त्या झंकारांतून खुद्द तंबोराच दादासाहेबांशीं लडिवाळ हितगुज करूं लागला आहे. ते स्वर दादासाहेबांना भडकावून टाकतात. क्षणांत विकल करून टाकतात.)*

**दादा :** *(विव्हलतेनें धुमसत)* कारटीं उन्मत्त झालीं आहेत. त्यांना कोणाचा धाक वाटेनासा झालाय. कोणाची दरकार उरली नाहीं त्यांना. ऐका! पंत, दिवसा ढवळ्या आमची पाठ वळली कीं आमच्या नाकावर टिच्चून कसा गाण्याचा धिंगाणा चालू आहे तो पाहा एकदा, घरांत. *(कातर स्वरांत)* बडेभय्या सूड घेत आहेत आमच्यावर सूड. तेंच गाण्याचं वेड...तोच वागणुकींतला बेछुटपणा... कदाचित् तींच व्यसनं...कदाचित् तसलीच एकादी बाई...कदाचित् पुन्हा एकदा —*(विव्हलतेनें)*...दामू...*(असें उद्गारत कपाळाला हात लावीत आवेगानें आंत जातात. क्षणभरानें जीजी दुसऱ्या दारानें प्रवेशतात.)*

**जीजी :** *(हलकेच पंतांना)* यांची तब्येत एकदम बिघडायला काय झालं?

**पंत :** *(बोट दाखवीत)* तंबोरा, दुसरं काय?

**जीजी :** *(वैतागानें)* यांचं नेहमींचंच आहे तें. तिन्ही-त्रिकाळ पोरांनीं चळचळा कापलं पाहिजे यांच्यापुढं. मोकळेपणानं या घरांत वावरायचीदेखील चोरी झालीय माणसांना. *(इकडे तिकडे पाहून सुगावा घेत)* बावड्याला गेला होतात त्या कामाचं काय झालं?

**पंत :** *(बैठक मारीत चंची सोडत)* व्हायचं आहे काय? बाबा महाराजांच्या अटी मान्य केल्या तेव्हांच रक्कम पदरांत पडली.

**जीजी :** त्यांनीं सांगितलेला व्याजाचा दर मान्य केला यांनीं?

**पंत :** नुसता व्याजाचा दर नव्हे, अमरोलीचीं शेतं लिहून द्यावीं लागलीं रावसाहेबांना.

**जीजी :** *(क्षुब्ध होऊन)* चांगलं. आतां कांहीं त्या जमिनी परत दिसायला नकोत.

**पंत :** *(हसून)* असंच कांहीं नाहीं. *(तंबाखू हातावर चोळत)* एवढं बापूरावांच्या लग्नाचं जमलं तर मग काय सगळं आपलंच आहे. सावकारांना तरी एवढी एकुलती एक मुलगी. तेव्हां माझ्या म्हणण्याचा अर्थ आलाच असेल आपल्या लक्षांत? आज उजव्या हातानं द्यायचं आणि उद्या डाव्या हातानं घ्यायचं.

**जीजी :** त्यांचं कांहीं सांगू नका तुम्ही मला! मुलगा व्हावा म्हणून या वयांत पुन्हा मंडोळ्या बांधून बोहल्यावर उभं राहायला सुद्धां तयारी होईल त्यांची.

**पंत :** *(हसून)* तेंहि कांहीं खोटं नाहीं म्हणा. म्हातारा तसा चांगला रंगेल आहे. आपल्या शकूताईच्याबद्दल माझ्याजवळ बारीक चौकशी चालली होती स्वारीची.

**जीजी** : इश्य! कांहींतरीच काय बोलतां?

**पंत** : कांहींतरी नव्हे. आपली एक माणसाच्या स्वभावाची गंमत सांगितली तुम्हांला. पण तें कांहीं असलं तरी बापूरावांच्या लग्नांत सगळी कसर भरून काढूं असं आश्वासन दिलंय त्यांनीं.

**जीजी** : *(हताशपणें)* त्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**पंत** : अर्थ नाहीं असं कां म्हणतां? मुलगी तशी कांहीं वाईट नाहीं. दिसायला जऽराऽ...

**जीजी** : दिसायचं राहूं दे. पण बापूला मान्य व्हायला हवं ना हें? त्याचे उद्योग बघतांच आहांत तुम्ही?

**पंत** : *(हसून)* हॅ हॅ—म्हणजे काय बोलणं झालं?

**जीजी** : बाबा महाराजांच्या कानावर या भानगडी आज ना उद्यां गेल्या तर काय होईल याचा विचार केला आहे का तुम्हीं?

**पंत** : तसं म्हणूं नका. म्हातारा पक्का आहे हं. गांवभर ज्याची चर्चा चालली आहे त्या गोष्टी सावकारांना काय माहित नाहींत असं म्हणतां तुम्ही?

**जीजी** : कोणीं सांगावं? कदाचित् त्यांच्या कानावर गेल्या असतील देखील या बाजारगप्पा. पण—

**पंत** : असतील नाहीं, गेल्याच आहेत. खुद्द माझ्याजवळ चौकशी केली बाबा महाराजांनीं. आतां बोला?

**जीजी** : अगबाई! आणि मग?

**पंत** : मग काय? आपण तरी खोटं किती सांगणार? पहिल्यांदा केली थोडी उडवाउडवी. पण मग सावकारांनीं तर तारीखवार बापूरावांच्या आणि त्या बयेच्या भेटीगांठीची रोजनिशीच वाचली माझ्यासमोर.

**जीजी** : *(घाबरून)* यांच्याजवळ बोलले का सावकार कांहीं त्यांतलं?

**पंत** : भलतंच? सावकारांना काय ठाऊक नाहीं रावसाहेबांचा स्वभाव? सावकारांनीं देखील तरुणपणीं कांहीं कमी रंगढंग केलेले नाहींत. असल्या गोष्टी कुठं बोलाव्यात आणि कुठं बोलूं नयेत एवढा पोंच नक्की आहे त्यांना. त्यांनीं मला आपलं बाजूला घेऊन बारिकशी कानगोष्ट केली.

**जीजी :** बापू अजून तिच्याकडं जातो असं कळलं यांना तर हे काय करतील नि काय नाहीं—

**पंत :** काय करतील? झोडपून काढायला कमी करणार नाहींत रावसाहेब. दामूरावांचं प्रकरण आहे ना लक्षांत?

**पंत :** पण ती बाई तसली आहे असं वाटतं तुम्हांला?

**पंत :** अहो, ह्या बायका सगळ्या सारख्याच.

**जीजी :** पण मला बापूबद्दल खात्री आहे. तो जरा गाण्याचा नादी आहे इतकंच. पण असलं कांहीं तो करील असं मला वाटत नाहीं.

**पंत :** *(हसून)* भोळ्या आहात तुम्ही, वहिनीसाहेब. अहो सगळे नाद आणि सगळे नादी प्रथम असेच सोज्वळ दिसतात. वयांत आलेल्या पुरुषांची कोणींहि खात्री देऊं नये. म्हणजे तें वयच तसं असतं. बापूरावांचा कांहीं दोष नाहीं त्यांत.

**जीजी :** तुम्हांला बापूबद्दल कांहीं नक्की समजलंय का?

**पंत :** नक्की म्हणजे...आतां त्यांचं जाणं येणं बघतांच तुम्ही. रात्रीं अपरात्रीं त्या माडींत रेंगाळणं...म्हणजे, काय म्हणतोंय मी...

**जीजी :** *(क्षुब्ध होऊन)* तुम्हांला देखील वाटतं ना कांहींतरी भानगड आहे म्हणून?

**पंत :** पण या भानगडीचा लग्नाशीं मात्र कांहीं संबंध नाहीं बरं का वहिनीसाहेब.

**जीजी :** लग्नाशीं संबंध नाहीं? म्हणजे?

**पंत :** म्हणजे त्याचं असं आहे, *(शब्दांशी चाचपडत)* आपलं सावकारांनीं सुचवलं तें सांगतों तुम्हांला. त्यांत माझ्या पदरचं कांहीं नाहीं हो? नाहींतर तुम्ही म्हणाल—

**जीजी :** *(अधीरतेनें)* काय, काय सुचवलं सावकारांनीं?

**पंत :** तसं विशेष कांहीं नाहीं. पण आपलं...म्हणजे हें प्रकरण परस्पर चालणार असलं...म्हणजे, बाहेरच्या बाहेर...काय समजलं? वाड्यापर्यंत तिचे हातपाय पोंचायला नकोत. आपली ठराविक रक्कम उचलून दरमहा पोंचती केली... लक्षांत आलं ना?...वाटल्यास एकादा जिन्नस, एकादं किमती वस्त्र...म्हणजे ती मोकळी आणि आपण मोकळे. असं कांहीं जमवतां आलं...

**जीजी :** आलं लक्षांत. तुम्ही समजलांत काय तिला? शिकलेली मुलगी आहे ती.

**पंत :** तुम्ही म्हणजे बोवा फारच...अहो, शिकली सवरली म्हणजे कोणी गवर्नर तर नाहीं ना झाली? मारे शाळेंत जाऊन मी म्हणतो बुकं फाड फाड वाचायला लागली. कबूल. पण घराणं कोणाचं? नायकिणीचंच ना? त्याचं काय?—असं चारी बाजूंनीं असं रान उठवलं म्हणजे...आलं ना लक्षांत?

**जीजी :** पण बापूला आवडेल का?

**पंत :** पुन्हा तेंच. बापूरावांचं राहूं द्या. रावसाहेबांनीं एकदां करायचं म्हटलं म्हणजे त्यांच्यापुढं बोलायची कोणाची टाप लागलीय? गप्पा झोकायला एरवीं सगळ्या ठीक आहेत. पण दुपारची वेळ कांहीं तंबोरा छेडून निभत नाहीं. बरं, यांत तसं वावगं कांहीं नाहीं.

**जीजी :** वावगं कांहीं नाहीं? म्हणजे?

**पंत :** *(हसून)* हो, म्हणजे, पिढ्यान् पिढ्या घराण्यांत जें चालत आलं आहे—

**जीजी :** *(उसळून)* यांच्याबद्दल बोलतां आहात तुम्ही?

**पंत :** *(नरमाईनें)* तसं नव्हे. रागावूं नका वहिनीसाहेब. माझ्या म्हणण्याचा विपर्यास होतो आहे हा. रावसाहेबांचं धुतल्या तांदळासारखं स्वच्छ चारित्र्य कोणाला माहित नाहीं?

**जीजी :** *(रागानें)* मग असं कसं म्हणालांत तुम्ही?

**पंत :** रावसाहेबांची एक गोष्ट सोडा. बडेभय्यांचं काय झालं? बडेभय्या गेले आणि त्या बयेचं आणि तिच्या पोराचं, म्हणजे त्या दामूचं, निस्तरतां निस्तरतां साहेबांचे काळ्याचे पांढरे झाले ऐन उमेदींतच. खरं आहे ना? बाकी तें पोरटंहि तसलंच. पंधराव्या वर्षीं हात दाखवून झालं ना पसार? बरं, बडेभय्याच्या वडिलांचं तरी काय? त्यांची तिसरीच एक तऱ्हा. म्हणजे एकूण काय—*(तंबाखूचा बकाणा भरीत हात झटकून मोकळे होतात.)*

**जीजी :** दामूभावोजींना उगाच नका गोवूं त्या मालिकेंत. त्यांचा कांहीं दोष नाहीं त्या प्रकरणांत.

**पंत :** खरंच, सांगायचं राहिलंच. दामूरावांचं नांव काढलंत म्हणून आठवलं. रावसाहेबांनीं नवीनच एक वेड काढलंय आणखी.

**जीजी** : वेड ? कसलं वेड ?

**पंत** : *(हसून)* छा छा. सगळीच मौज आहे झालं.

**जीजी** : पण झालं तरी काय असं ? गाडींत कांहीं प्रकार तसा घडला का ?

**पंत** : गाडींत म्हणजे,—हो गाडींतच म्हणायचा. प्रकार तसा कांहीं विशेष नाहीं. पण सांगायची गंमत म्हणजे, रावसाहेबांना बावड्याहून परत येतांना आज गाडींत दामूराव भेटले.

**जीजी** : *(चकित होऊन)* काय ? काय म्हणालांत ?

**पंत** : रावसाहेबांना आज गाडींत दामूराव भेटले. आतां बोला ?

**जीजी** : दामोदरभावोजी ? गाडींत भेटले ? छे, शक्यच नाहीं.

**पंत** : पण रावसाहेबांचं म्हणणं आहे कीं—

**जीजी** : पण खरंच भेटले का ?

**पंत** : छे छे, काय वेड ? नाहीं तुम्हीच सांगा वहिनीसाहेब, पंचवीस वर्षांपूर्वी पळालेला पोरगा असा अचानक बावड्याच्या वाटेवर गाडीमधें भेटणं कधीं शक्य आहे काय ? कांहींतरी डोक्यांत घेऊन बसतात झालं रावसाहेब.

**जीजी** : तसं वाटायला भेटलं तरी कोण यांना गाडींत ?

**पंत** : अहो भिकारी. आणि तोहि अर्धवट वेडा. दाढीमिशांचे खुंट वाढलेले, केस पिंजारलेले, तोंडांतून लाळ गळतेय, अंगावर घाणेरडीं लक्तरं लोंबताहेत— आरारारा, ओंगळ अवतार होता नुसता. तुम्ही बघायलाच हवी होती ती चीज वहिनी.

**जीजी** : इश्श्य ! आणि त्या खुळ्याला का हे दामोदरभावोजी समजले ?

**पंत** : पाहा म्हणजे झालं. आणि मला आग्रह चालला होता कीं याला घेऊन आपण वाड्यावर जाऊं या. बरं, उलट भाषा करायची पुन्हा कोणी सोय नाहीं.

**जीजी** : अगबाई. असलं ध्यान मीं क्षणभर घरांत उभं करून दिलं नसतं.

**पंत** : नाहीं, म्हणजे त्याचं झालं काय, *(सुपारी कातरीत)* कोठल्याशा आड स्टेशनला गाडी उभी राहिली, तेव्हां भीक मागतां मागतां चुकून हा खुळा आमच्या डब्यांत चढला, आणि लागला बांसरी वाजवायला. त्याबरोबर साहेब

ताड्कन् झोपेंतून उठले. मला गदागदा हालवून त्यांनीं जागं केलं आणि म्हणाले, "ही दामूची बांसरी आहे."

**जीजी** : इश्य! अजून जशी कांहीं यांच्या स्मरणांतच राहिली आहे दामूची बांसरी कीं नाहीं?

**पंत** : नाहीं, मी म्हणतों असेल. पण बांसरीसारखी दुसरी बांसरी नसते का?

**जीजी** : तेवढ्यावरून का यांनीं ठरवून टाकलं, कीं—

**पंत** : ऐका तर खरं? मी चक्क त्यांना सांगतों आहे कीं, अहो, आतां कोठला दामू? तर मला म्हणतात रावसाहेब, "तूं मधें तोंड घालूं नकोस. मला माझा भाऊ चांगला ओळखतां येतो." मला ऐकतात काय रावसाहेब? स्वतः जातीनं ते त्या खुळ्यापाशीं गेले, घटकाभर त्याला न्याहाळत बसले. कोठं हातच पाहा, कोठे दांतच तपास, नाना तऱ्हा केल्या रावसाहेबांनीं.

**जीजी** : अगबाई! आणि मग?

**पंत** : *(हंसून)* गप्पा देखील मारल्या त्याच्याशीं. आतां बोला?

**जिजी** : पण धड नीट बोलला का तरी तो?

**पंत** : अहो टार वेडा झालेला भिकारी तो—तो काय कपाळ बोलणार? स्वतःचं नांवदेखील धड सांगतां येत नव्हतं लेकाच्याला. "गरीबाला पैसा दे भगवान..." म्हणून गायचा काय, नाचायचा काय, आणि रावसाहेब लागले "दाम्या, दाम्या" करून कुरवाळायला. *(हसून)* छा छा, मौज होती झालं.

**जीजी** : यांचं असंच आहे. त्यावेळीं बांसरी वाजवण्यावरून बडव बडव बडवलं. अगदीं हाय खाऊन पोर घरांतून पळून जाईपर्यंत मारलं. आणि आतां—

**पंत** : छे छे, असं म्हणूं नका वहिनी. इथं तुमचं चुकतं!

**जीजी** : काय चुकतं?

**पंत** : तुम्हींच असं बोलायला सुरवात केली तर रावसाहेबांना मेल्याहून मेलं वाटेल, नाहींतर काय होईल? उगाच नाहीं त्यावेळीं रावसाहेब भ्रमिष्ट झाले!

**जीजी** : चांगलं! म्हणजे माझ्या बोलण्यानं का ते भ्रमिष्ट झाले?

**पंत** : तुमच्या एकट्याच्या बोलण्यानं नाहीं म्हणत मी. पण सगळ्यांनींच—म्हणजे दूरच्यांनीं तसंच जवळच्यांनीं असं टोंचून खोंचून बोलायला सुरवात केली तर—

**जीजी :** पण खोटं तर नाहीं ना तें?

**पंत :** पुन्हा तेंच. खोटं म्हणजे? साफ खोटं आहे. म्हणजे असं पाहा—रागावूं नका वहिनी, पण लहान पोर आहे...काय समजलं? वागणुकीच्या रीतीभाती अजून मुरल्या नाहींत...तेव्हां चुका व्हायच्याच. कबूल. मग वडील माणसांनीं रागवायचं नाहीं का? बरं रागाच्या भरांत चारदोन तडाके कमीजास्त झाले—काय समजलं? म्हणजे दामूला माणसांतून उठवायला तर नव्हते ना निघाले रावसाहेब?

**जीजी :** तसा कोणीं त्यांच्यावर आरोप तरी केला आहे का? आपणच कांहींतरी—

**पंत :** मी म्हणतों, म्हणाले असतील कांहीं चाग्गट लोक—अहो बोलणाराच्या तोंडाला हात लावतां येतो का? नाहीं तुम्हीच सांगा वहिनी—त्या, त्या बयेच्या घरांतून या तान्ह्या पोराला उचलून रावसाहेबांनीं वाड्यावर आणला—त्यावेळीं या कावळ्यांनीं काय कमी काव काव केली होती का? बरं त्यानंतर इतकीं वर्षं कौतुकानं या पोराला खाऊं पिऊं घालून वाढवला, त्या वेळीं नाहीं चौकशी करायला आले कोणी तालेवार? उगाच लोकांना फुकाची जीभ चालवायला काय पैसे पडतात? चाललंच आहे! माझ्या म्हणण्याचा अर्थ आला ध्यानांत वहिनी? आपल्याला करायचं तें आपण केलं. मी म्हणतों, रीतीपेक्षां कांकणभर जास्तच केलं. आतां नव्हतं त्या पोराच्या नशिबांत...सोडून दिलं! काय? पण रावसाहेबांचं म्हणजे तसं नाहीं...

*(तेवढ्यांत दादासाहेबांची हाक ऐकूं येते. "बापू, अग शकू, कोण आहे रे तिकडं?")*

**जीजी :** *(दचकून)* अगबाई! आले वाटतं हे!

*(पंत गडबडीनें चंची सावरून कपाटामधली एक कीर्द काढून त्यांत डोकें खुपसून बसतात. जीजी गडबडीनें जाऊं लागतात. तोंच दादासाहेब कपडे बदलून प्रवेशतात. जीजी दारांतच घाबरून थबकून उभ्या राहतात.)*

**दादा :** *(साध्या बोलण्यांतहि अकारण अरेरावी)* आम्हाला थंड पाणी पाठवून द्या बाहेर.

**जीजी :** *(फाजील अदबीनें)* थंड सरबत तयार करून पाठवूं का?

**दादा :** *(दरडावून)* पाणी म्हणजे पाणी. सरबत नाहीं.

**जीजी :** *(भेदरून)* हो हो पाठवते पाणी. *(जाऊं लागतात, तोंच—)*

**दादा :** आणि हें पाहा, बापूला घेऊन तुम्हीच या इकडं. बापूच्या लग्नाचं आम्ही काय करायचं ठरवलं आहे तं समजावून सांगायचं आहे तुम्हां दोघांना. कुठं आहे बापू?

**जीजी :** *(घाबरून)* वर.. खाली...नव्हे...होय बहुतेक खालींच असेल.

**दादा :** *(चिडून)* वर? खालीं? बहुतेक? तुम्ही तरी ठिकाणावर आहांत ना नक्की? हेंच तुमचं घरांतलं लक्ष? छान छान, चांगला चालला आहे घरचा कारभार. पोरं कुठं उंडारतात त्याचा आईला पत्ता नाहीं, आई काय करते त्याची पोरांना माहिती नाहीं. जा त्याला घेऊन या. असेल तेथून बोलावून घ्या. आम्ही बोलावलंय म्हणून सांगा. सगळ्यांच्या मिजाशी आम्हांला एकदा मोडल्याच पाहिजेत.

*(जीजी मुकाट्यानें मागल्या पावलीं जातात. कीर्दीत डोकें खुपसून बसलेल्या पंतांच्याकडे दादासाहेब क्षणभर रोखून पाहतात. मग विचारमग्न मुद्रेनें पाठीमागें हात घेऊन शतपावली घालूं लागतात. त्यांची करारी मुद्रा करुण होते. आवाजांत कातरपणा येतो)*

**दादा :** पंत?

**पंत :** जी रावसाहेब?

**दादा :** माधवदेखील आज घर सोडून निघून गेला.

**पंत :** मला वाटलंच होतं. *(गडबडीनें सावरीत)* नाहीं म्हणजे, चुकलंच माधवरावांचं जरा.

*(तेवढ्यांत दादासाहेबाना दुरून अस्पष्ट बांसरीचा आवाज ऐकूं आल्याचा भास होतो. दादासाहेब चरकल्यासारखे होतात आणि शून्य-मनस्कतेनें कोठेंतरीच नजर लावतात. पण क्षणभरच. दुसऱ्याच क्षणीं भानावर येत ते विचारतात—)*

**दादा :** आं? काय म्हणालांत?

**पंत :** नाहीं म्हणजे आपल्या बोलण्यांत तसं कांहीं वावगं नव्हतं. अशी डोक्यांत एकदम राख घालून जाण्यांत चूकच केली त्यांनीं.

**दादा :** चूक त्याची कीं आमची ईश्वर जाणे. *(पुन्हा शतपावली. क्षणभरानें)*

या पोरांचीं माथींच उलटीं बसलीं आहेत कीं आम्हांलाच ईश्वरानं जगावेगळं घडविलं आहे कांहीं समजत नाहीं. *(क्षणभरानें मुस्कारून)* मर्जी त्याची. *(पुन्हा शतपावली घालूं लागतात. मग क्षणभरानें)* पंत?

**पंत :** जी रावसाहेब?

**दादा :** *(गंभीरपणानें)* आम्हांला वाटतं आपण चूक केली.

**पंत :** *(न समजून)* चूक?

**दादा :** होय, त्या खुळ्याला आपण वाड्यावर आणायला हवा होता. निदान खऱ्या खोट्याची शहानिशा झाली असती म्हणजे आमच्या मनावरला भार तरी दूर झाला असता.

**पंत :** निव्वळ गैरसमज आहे रावसाहेब हा आपला.

**दादा :** *(पंतांच्याकडे रोखून बघत, शून्यमनस्क होत)* गैरसमज? गैरसमज? हां हां, गैरसमज. काय म्हणालांत? गैरसमज? *(भानावर येत)* आमची नजर आम्हांला दगा देण्याइतके आम्ही बुड्ढे झालों आहोंत असं आम्हांला वाटत नाहीं.

**पंत :** तसं नव्हे, पण त्या खुळ्याला आपलं नांवगांव तरी सांगतां आलं का? आपण परोपरीनं इतके प्रश्न केले त्याला, पण एकाचं तरी धड उत्तर दिलं का त्यानं?

*(तेवढ्यांत दादासाहेबांना पुन्हा अस्पष्ट बांसरी वाजल्याचा आवाज ऐकूं आल्यासारखें वाटतें, दादासाहेब कावरेबावरे होतात.)*

**दादा :** *(दचकून भानावर येत)* तुम्ही कसला आवाज ऐकलात का?

**पंत :** *(विस्मयानें)* आवाज? कसला आवाज? नाहीं बोवा.

**दादा :** मग मलाच भास झाला असेल. काय म्हणत होतां तुम्ही?

**पंत :** नाहीं, मी म्हणत होतों, आपण त्याला इतके परोपरीनं प्रश्न विचारीत होतां पण एकाचं तरी त्यानं उत्तर दिलं का?

**दादा :** घरच्या माणसांची आमच्यापेक्षांहि तुम्हांला अधिक ओळख म्हणून तुम्हांला पुसलं. पण पंत, तुम्हीदेखील बुड्ढे झालांत. त्या ओंगळवाण्या अवतारालाच तुम्ही फसलांत. तुमची नजर मालकाशीं इमान राखीनाशी झाली. तुम्हांला तुमचा धनी ओळखता आला नाहीं म्हणून आम्हाला आमचा भाऊ ओळखतां येत नाहीं का?

**पंत :** भाऊ?

**दादा :** कसाहि असला तरी भाऊ तो भाऊच. पाठचा भाऊ म्हणूनच ना वाढविला आम्हीं त्याला? ती बाई वारली तेव्हां अवघा वर्षाचा देखील नव्हता दामू. या, या आमच्या हातांनीं आम्हीं त्याला कडेवरून घरीं आणला, न्हाऊं माखूं घातला. आमची आई त्याच्या अंगाला हात लावायला देखील तयार नव्हती, तर पहिल्या दिवशीं आम्हीं त्याला पाळण्यांत घालून निजवला. पंत, तुम्ही सारं सारं कांहीं विसरलांत.

**पंत :** छे छे, असं कसं होईल? खडान् खडा सगळ्या गोष्टी आठवताहेत मला. चित्रासारखं रूप उभं आहे दामूरावांचं माझ्या डोळ्यांसमोर. आहाहा, काय ती ऐटदार मूर्ति, तो हसरा चेहरा, तो रुबाब, तो थाटमाट—

*(तेवढ्यांत हलकेच, अगदीं आणि दूरवर कोठेंतरी बरें का, दादासाहेबांना बांसरीचा आवाज आल्याचा भास होतो. ते पुन्हा एकदा शून्यमनस्क होतात. क्षणभरानें पुन्हा दचकून भानावर येतात.)*

**दादा :** *(भानावर येत)* तो पाहा ऐकलात?

**पंत :** *(विस्मयानें)* काय? काय ऐकलात?

**दादा :** *(कानोसा घेत)* कांहीं नाहीं. मला आपली शंका आली—

**पंत :** कसली शंका?

**दादा :** विशेष कांहीं नाहीं. पण तो खुळा तसाच पुढें नक्की गेला गाडींतून याची खात्री आहे ना तुम्हांला?

**पंत :** कोण! तो भिकारी? गेला म्हणजे? अहो, मीं माझ्या डोळ्यानं पाहिला गाडींतून पुढं जातांना.

**दादा :** मग कांहीं हरकत नाहीं. *(क्षणभरानें, कातर स्वरांत)* आमच्यापेक्षां तो संतापी माथ्याचा म्हणून तो असा खुळा झाला असला पाहिजे. पंत, त्या खुळ्याचे केस पाहिलेत? *(क्षणभरानें)* पोरगा वाया गेला. आमच्यामुळें दामू देशोधडीला लागला. *(क्षणभरानें सुस्कारून)* चला, मर्जी ईश्वराची. पंत आमची ज्ञानेश्वरी आणा बघूं! ज्ञानदेवींतील चार ओव्या वाचल्या म्हणजे मन कसं निवून थंड होतं.

*(पंत काम आवरून गडबडीनें उठतात. कपाटावरील ज्ञानेश्वरीची प्रत एका चौरंगावर ठेवून तो चौरंग बैठकीच्या जागीं गादीपुढें ठेवतात. दादासाहेब गादीवर स्थानापन्न होतात. पंत निघून जातात. दादासाहेब ज्ञानेश्वरींतील स्थितप्रज्ञ साधूचीं लक्षणें आपल्या रांगड्या आवाजांत वाचं लागतात. त्याच वेळीं—*

*दुरून कोठून तरी रात्रीच्या आठाचे टोले पडूं लागतात. दादासाहेब मान वर करून कोठें तरी शून्यांत नजर लावतात. घंटेचा चवथा टोला पडूं लागतांच रंगभूमीवरील पांढरा प्रकाश मालवला जातो आणि निळसर प्रकाशानें रंगभूमि उजळते. त्याच वेळीं प्रथम विचित्र सुरावटीचें पार्श्वसंगीत वातावरण भरून टाकूं लागतें. जणूं पुढील अद्भुतरम्य भासचित्ताची ही नांदीच होय. पुढील सबंध प्रसंगांत पार्श्वसंगीत चालू राहतें. आणि इतकें झाल्यावर—*

*दुरून काठून तरी बांसरीचे स्वर एकूं येतात. प्रथम प्रथंम अस्पष्ट. पुढें स्पष्ट आणि जवळ. ते स्वर ऐकूं येईपर्यंत दादासाहेब तसेच शून्यांत नजर लावून बसलेले असतात. पण बांसरी ऐकूं येताच ते अस्वस्थ होतात. कावरे-बावरे होऊन सभोवतालीं चाहूल घेऊं लागतात. कोणी दिसत नाहीं, तेव्हां ते अगतिकतेनें पुन्हा जागेवर बसतात. तोंच क्षणभरानें "गरिबाला पैसा दे भगवान" हें गाणें रांगड्या आवाजांत दूरवर कोणी म्हणत असल्याचे ऐकूं येतें. दादासाहेब पुन्हा कावरेबावरे होतात. तेवढ्यांत गाण्याचा आवाज जवळ यत येत अखेर वेडेवाकडे हातवारे करीत नाचत गात खुळा दामू खिडकीशीं आलेला दिसतो. त्याबरोबर दादासाहेब ताडकन् उठतात.)*

**दादा :** *(चकित होऊन)* कोण ? कोण ? तूं...तूं...तूं आलास ?

*(नाचतां नाचतां खुळा दामू टुणूकन् उडी मारून खिडकींतून आंत येतो. दादासाहेबांची मुद्रा पाहतांच एकदम् गप्प उभा राहतो. मग वेड्यावाकड्या माना करून त्यांच्या तोंडाकडे तो पाहूं लागतो.)*

**दादा :** *(व्याकुळतेनें)* असा बघतोस काय माझ्याकडे. ए खुळ्या, काय काय शोधतो आहेस तूं. *(खुळा दामू खदाखदा हसूं लागतो.)* हसूं नकोस. नको रे हसूं. पोट दुखायला लागेल. हसूं नकोस रे बाबा. *(खुळा ऐकत नाहींसें बघून,*

*दरडावून—)* हंसू नको म्हणतों ना ? *(खुळा घाबरतो. एकदम् गप्प होतो. थर-थर कांपूं लागतो. कांपतां कांपतां मुसमुसून रडूं लागतो. रडतां रडतां एकदम् दादासाहेबाचे पाय धरतो.)*

**खुळा दामू :** *(कळवळून)* दादा मला मारूं नका...मारूं नका, वाटल्यास घर सोडतों...पण मारूं नका हो मारुं नका...

**दादा :** *(कळवळून त्याला उठवत)* वेडा कोटला. मारतोय कोण तुला ? ऊठ, ऊठ, शांत हो बघूं. ये इकडं. असा इथं गादीवर नीट बस बघूं. *(खुळा गादीवर बसतो)* हं सांग पाहूं तुझं नांव ? बघत काय राहिला आहेस नुसता ? अरे तुझं नांव काय ? *(खुळा नुसता भित्रेपणानें बघतच राहतो.)* सांग ना ? नाहीं सांगायचं ? आम्हांला देखील ? बरं बोवा राहिलं, नको सांगूस. मग आम्ही सांगूं का ? बोल, सांगूं का आम्ही तुझं नांव ? ऊं ? बघ बरं ? दामू. *(हसतात.)* ओळखलं कीं नाहीं ? *(खुळा देखील हसतो)* अरे लबाडा, आमच्यापासून लपवून ठेवत होतास नाहीं का ? ऊं ? गाडीमधें विचारीत होतो तर थांग लागूं दिला नाहींस अगदीं. तूं बोलला नाहीस म्हणून आम्हांला ओळखतां येत नाहीं असं वाटलं होय तुला ? *(दादा स्वतःशीच हंसतात)* अरे आपले पंतदेखील फसले या तुझ्या अवताराला. *(रंगांत येऊन दामूच्या खांद्यावर थाप मारीत हसतात. तोंच दामू विव्हळून दूर सरतो. दादासाहेब दचकतात. काळजीच्या स्वरांत)* काय रे झालं विव्हळायला ! *(जवळ जाऊन त्याचं सारं शरीर नीट न्याहाळत)* हें काय ? हें काय रे ? हे वळ कोठले तुझ्या अंगावर ? *(क्षणभरानें घाबरून)* कोणी मारलं वाटतं तुला ? *(चुकचुकत)* काय माणसं असतात तरी ! कोण कोण हा चांडाळ ? *(एकदम शंका येऊन)* दाम्या, मीं मारलं तेव्हांचे तर वळ नाहींत ना हे ? तेव्हांचे वळ अजून कसे असतील ? *(खुळा दामू आपलें अंग चोळूं लागतो. तें बघून अजीजीनें—)* छे छे, दाम्या, हें कांहीं खरं नाहीं. इतकं कांहीं मारलं नाहीं हं तुला. खरंच अगदीं माझ्या गळ्याशपथ सांगतों मी तुला. *(करुण हसून)* आणि टाऊक आहे का गुलामा, पंचवीस वर्षे झालीं त्या प्रकाराला—पंचवीस. आतां कसे असतील त्या वेळचे वळ ? वेडा आहेस झालं. दुसऱ्या कोणींतरी मारलं असेल तुला. आणि हें काय ? *(त्याची झोळी तपासूं लागतात. दामू झोळी हिसकावून घेतो. झोळीतील शिळ्या भाकरीचे तुकडे काढून तो मचमच आवाज करीत खाऊं लागतो.)* शी शी. दे, दे ती भाकरी टाकून. *(दामू ऐकत*

*नाहीं.)* दे म्हणतों ना टाकून. दाम्या—दाम्या—तुला कसं सांगावं? *(त्याच्या हातांतली भाकरी हिसकावून खिडकींतून भिरकावून देतात.)* दाम्या, तुझा दादा जिवंत असेपर्यंत तरी हे तुकडे मोडायची जरुरी नाहीं. पुढं ईश्वराची मर्जी. *(त्याला कुरवाळत)* भूक लागलीय का तुला? जेवतोस का? *(खुळा मानेनें 'होय' म्हणतो.)* चल खाली स्वयंपाकघरांत. चल ऊठ. *(खुळा जागचा हलत नाहीं.)* चल ना. ए वेड्या, जेवायला येतोस ना? *(खुळा मानेनें 'नाही' म्हणतो.)* नाहीं? स्वयंपाकघरांत नाहीं यायचं? बरं राहिलं. मग? मग इथं आणवूं का तुझं ताट? *(खुळा मानेनेंच 'होय' म्हणतो.)* तूं म्हणजे असा लाडोबा झाला आहेस दाम्या—*(असें म्हणत दादासाहेब दाराशी जाऊन "अरे, रामशरण?" अशी हाक मारतात. तों रंगभूमीवरील सगळे दिवे पटकन् मालविले जातात. क्षणार्ध अंधार होतो. पार्श्वसंगीत घाव घालून तोडल्याप्रमाणें खपूकन् बंद होतें. पुन्हा प्रकाशानें रंगभूमि उजळते त्या वेळी दामूचा मागमूसदेखील दिसत नाही. तें लक्षांत येतांच दादासाहेब चपापतात.)*

**दादा :** *(दचकून)* म्हणजे? याचा अर्थ काय? दामू कुठं आहे? दामू, अरे दामू. *(हाका मारीत चोहींकडे शोधीत)* अहो पंत, अरे बापू, चंदू, शकू, अरे धावा धावा...

*(पंत, जीजी, बापू, शकू घाबरून निरनिराळ्या दारांतून धावत येतात आणि परस्परांना "काय झालं? काय झालं?" असें विचारूं लागतात.)*

**दादा :** *(अधीरतेनें)* काय झालं म्हणून काय विचारीत बसलां आहांत? दामू कुठं आहे? बोला, दामू कुठं आहे?

**बापू :** दामू? कोण दामू?

**जीजी :** कोण दामोदरभावोजी? आणि इथं?

**दादा :** आत्तां इतका वेळ इथं बसला होता. माझ्याशीं चांगला बोलत होता.

**पंत :** इथं तर कोणी आलं नाहीं कीं कोणी गेलं नाहीं. मी बाहेरच बसलों आहें नव्हे का?

**शकू :** मी देखील बाहेर बागेंत होतें. मला नाहीं कोणी दिसलं.

**दादा :** *(संतापून)* आम्हांला खुळ्यांत काढतां काय? आम्ही खुद्द जातीनं त्याला घरांत घेतला. त्याच्याशी बातचीत केली. त्याला भूक लागली म्हणून—

*(एकदम काहीसें आठवून)* या, या खिडकींतून तो आंत आला. तसाच वेडाच्या भरांत या खिडकींतूनच तो उडी टाकून पळाला असला पाहिजे. टकमक तोंडाकडं पाहतां काय आमच्या? धावा, पळा अगोदर. पंत, तुम्ही—

**पंत :** जी रावसाहेब?

**दादा :** जा आधीं बागेचा कानाकोपरा शोधा. बापू, तूं—

**बापू :** काय दादा?

**दादा :** तूं रस्त्यावर जा आणि पाहा कुठं दिसतो का तें. शकू, तूं—

**शकू :** *(थरथरत)* होय दादा, जातें मी—

**दादा :** आधीं पळूं नकोस. नीट सांगतो तें ऐक. मागें परसांत जाऊन नीट शोध घे त्याचा. एकादे वेळीं पर्णकुटींत देखील बसला असेल जाऊन आपल्या नादांत तो.

*(सगळी मंडळी घाबरून पळापळ करूं लागतात.)*

**जीजी :** पण मी म्हणतें—

**दादा :** *(दरडावून)* कोणीं कांहीं म्हणायची या वेळीं जरुरी नाहीं. वाड्याचा कानाकोपरा धुंडून जातीनं बघा तुम्ही कुठं सांपडतो आहे का तो तें. *(त्याहि घाबरून पसार होतात. दादासाहेब खिडकीशी जाऊन ओरडून सांगतात.)* आणि हें पाहा, कोठे दिसला तर गोडीगुलाबीनें घेऊन या. मारूंबिरूं नका हो... *(असें म्हणत ते स्वतःहि बाहेर धावतात. आणि त्याच वेळी—)*

**प ड दा**

# ॥ २ ॥

*[स्थळ पूर्वीचेंच. मागील प्रसंगानंतर कांही दिवस उलटले आहेत. वेळ संध्याकाळची. जीजी आणि शकू दिवाणखाना सजवीत आहेत. रावजी अखेरचा झाडू मारीत आहे. कोण्या बडया पाहुण्याच्या स्वागताची ही तयारी असावी हें उघडच आहे.]*

**जीजी :** *(प्रवेशत)* किती वेळां केर काढतो आहेस रावजी?

**रावजी :** मग काय करणार बाई? जरा का माडीवर दानदान पावलं आपटीत चाललं की खाली बदाबदा मातीचा पाऊस पडतूया.

**जीजी :** शंभर वर्षांवर उमर झाली असेल या वाड्याची. दगडमाती तरी किती दिवस तग धरणार?

**रावजी :** एकदां वरल्या माडीच्या भिंती आणि जमिनी पुन्हा करून घ्यायला सांगा बाई रावसाबांन.

**जीजी :** पैसे कोठून आणायचे त्याची युक्ती सांग एखादी.

**रावजी :** *(हसून)* आता ती युगत मला ठावं असती तर बाई हा झाडू घेऊनशान् कशाला राबलो असतो मी आपल्या वाड्यावर?

**जीजी :** सगळीं सोंगं करतां येतात, पण पैशाचं सोंग नाहीं आणतां येत. दुरुस्त्या तरी कुठं कुठं करायच्या? सगळं घरच तिथं मोडकळीला आलंय्— *(केर उचलून रावजी निघून जातो, तेवढ्यांत शकू फुलांनी नटलेली एक फुलदाणी घेऊन प्रवेशते.)*

**शकू :** जीजी, ही फुलदाणी ठेवूं का या चौरंगावर?

**जीजी :** फुलदाणी! छे नको ग बाई. पुन्हां बोलणीं खायचीं आहेत का यांच्याकडून?

**शकू :** इश्य! तुझं आपलं मुलखावेगळं कांहींतरीच. बघ तरी कसे टपोरे रसरशीत गेंद आहेत गुलाबाचे ते.

**जीजी :** यांना आवडायचा नाहीं हो असला चंगीभंगीपणा.

**शकू :** *(वैतागानें)* यांत चंगीभंगीपणा ग कसला? कोणाच्या घरांत का कधीं फुलदाणी ठेवीत नाहींत की--

**जीजी :** आपल्या घरांत असल्या छानछोकीच्या वस्तू ठेवलेल्या यांना नाहीं आवडत, टाऊक आहे ना? मग पुन्हा पुन्हा कशाला तोंच तो वाद उकरून काढायचा ?

**शकू :** दादांना काय आवडतं म्हणून ही फुलं तरी आवडावींत? सगळ्या घराचं उजाड माळरान करून टाकलंय. ही बैठक तरी सरळ करूं का? की आणखी वेडीवाकडी केल्यानं शोभा येणार आहे या दिवाणखान्याला?

**जीजी :** बावड्याचे सावकार यायचे आहेत म्हणून खपेल एकवेळ ही हलवा-हालव, समजलीस बाई?

**शकू :** बावड्याचे सावकार? तें सुद्धां ध्यान यायचं आहे कीं काय?

**जीजी :** ध्यान? सावकारांना का ध्यान म्हणते आहेस तूं?

**शकू :** मला नाहीं आवडत मेला तो फाजील. घरीं आला म्हणजे कसा वखवखल्यासारखा टक लावून बघत बसतो माझ्याकडं.

**जीजी :** बापूला मुलगी दाखवायला घेऊन यायचे आहेत सावकार इथं, तुला मागणी घालायला नव्हे.

**शकू :** तेवढंदेखील करायला कमी करायचा नाहीं तो. मला त्याचं कांहींएक सांगूं नकोस तूं.

**जीजी :** बरं बरं, कळला आपला शहाणपणा. मागणी घातली तुला साव-कारांनीं तर देऊन टाकूं तुला त्यांना, समजलीस? सावकारांच्या संपत्तीला तरी कोणी वारस नको का?

**शकू :** *(चिडून)* जीजी—

**जीजी :** *(हसून)* काय वाईट आहेत ग सावकार? चांगले राजाच्या राणीसारखे थाटामाटांत ठेवतील तुला, आहेस कुठं?

**शकू :** बघ हं जीजी—

**जीजी :** *(हसून)* आतां हवी तेवढी "नाहीं नाहीं" म्हण. पण—

**शकू** : *(धावून जीजीचें तोंड दाबीत)* आतां गप्प बसतेस कीं नाहीं?

*(तेवढ्यांत मागून नकळत चंदू येतो आणि दादासाहेबांच्या आवाजांत ओरडतो—)*

**चंदू** : काय चालला आहे घरांत हा तमाशा? घरांत कोणी वडीलधारीं माणसं आहेत कीं नाहींत?

**शकू** : *(घाबरून दूर होत, फुलदाणी पाडीत)* अगबाई...दादा...

**जीजी** : आं, काय? उचल उचल ती फुलदाणी लवकर.

*(दोघी लगबगीनें धावपळूं लागतात तोंच चंदू खो खो हसत येतो.)*

**जीजी** : चंद्या, मेल्या शोभतो का तुला असला फाजीलपणा?

**शकू** : बघ तर खरं, किती घाबरलें मी?

**चंदू** : घाबरायला कशाला हवं? दादा म्हणजे कोणी राक्षस आहेत कीं वाघोबा आहेत?

**जीजी** : घरांत नाहींत हे म्हणून सुचते आहे ही भाषा.

**शकू** : नाहींतर काय? मग खिडकी आहेच उडी मारून पसार व्हायला.

**चंदू** : त्यांचे देव्हारे माजवावेत तुम्हीच. हा पठ्या असा कोणाला डरणारा नाहीं. वडील झाले म्हणून काय—

**जीजी** : पुरे झाल्या तुझ्या बढाया.

**चंदू** : *(दिवाणखान्यांतला फेरबदल स्वारीच्या आतां कोठें लक्षांत येतो. तो पाहून विस्मयांत)* बाय जोव्ह आं? अरे आहे काय आज?

**जीजी** : *(हसून)* शकूचं लग्न.

**शकू** : जीजी, बघ हं आतां—

**चंदू** : अरे म्हणजे चमत्कार आहे. मी आपल्याच घरांत आलोंय ना? कीं कोणा भलत्याच्या घरांत शिरलोंय मी?

**शकू** : भलत्याचं घर वाटायला रे काय झालं?

**चंदू** : काय झालं? अग पाहा पाहा एकदा ही सजावट, हा थाटमाट, ही स्वच्छता *(जमीन न्याहाळत)*...म्हणजे आज कोणी तरी चावटपणानं केर काढलेला दिसतोय या दिवाणखान्यांतला.

**जीजी :** चंद्या, मेल्या—

**चंदू :** आणि वर गाल्चिाहि झटकलेला दिसतोय्? कोण हा नतद्रष्ट चांडाळ? अग, गेल्या शंभर वर्षांत तरी या घरांतल्या माणसांनीं कधीं केरसुणीला हात लावला होता का? आणि हें काय? आमच्या परमदयाळू जॉर्ज बादशहांची आणि मातुःश्री मेरी राणीसाहेबांची तसबीर कुठं आहे?

**शकू :** मींच काढून टाकली आज ती. शोभते का तरी या दिवाणखान्याला ती?

**जीजी :** शकू—

**शकू :** तुझं मी कांहीं ऐकणार नाही हं जीजी त्या तसबिरीबद्दल.

**चंदू :** ऐकणार नाहीं म्हणजे? राजद्रोहाखालीं फिर्याद करीन. काय समजलीस?

**शकू :** होऊं दे माझं काय व्हायचं असेल तें. पण असला आचरटपणा घरांत मी नाहीं चालूं द्यायची.

**जीजी :** आपल्या हक्काच्या घरांत गेलीस म्हणजे—

**शकू :** जीजी, हें ग काय जेव्हां तेव्हां माझ्या लग्नाचं बोलतेस?

**चंदू :** आणि हा काय प्रकार आहे? *(फुलदाणीजवळ जातो.)*

**जीजी :** कसला प्रकार? ती फुलदाणी होय? या बयाबाईचा कारभार. सावकार यायचे आहेत ना? त्यांना एव्हांपासून—

**शकू :** *(ओरडून)* जीजी—

**चंदू :** *(दादासाहेबांची नक्कल करीत)* पाहा, पाहा पंत. मी सांगत नव्हतों? हे हे असले उद्योग करायला वाड्यावरच्या माणसांना वेळ आहे. कांहीं अडलं होतं का त्यावांचून? ही फुलदाणी! *(उचलीत आणि न्याहाळून तोंड आंबट करीत)* किती सुंदर दिसते बरं ही? हीं त्यांतलीं फुलं! *(वास घेऊन नाक फेंदारीत)* शी! अरारारा! कसला सुगंध सुटला आहे कोण जाणे. *(जीजी आणि शकू दोघीहि खळखळून हसतात. मग चंदूहि हसतो.)*

**जीजी :** *(हसूं आवरीत)* पुरे पुरे. लोकांच्या नकला करायचं शहाणपण तेवढं तुझ्या अंगीं छान आलंय्. घरांतल्या कामाला तुझा काडीचा उपयोग असेल तर शपथ.

**चंदू :** कां बोवा? आमच्यावांचून कोणत्या कामाचा खोळंबा झाला आज? तरी

बरं आहे आज सकाळपासून घरच्या कामासाठींच पायपीट करीत हिंडतों आहें. पायाचे अगदीं तुकडे पडायची पाळी आली आहे. *(विव्हळत)* आहाहा.

**शकू :** सांगितली होती कोणीं एवढी पायपीट करायला?

**जीजी :** गेला असेल कोठें तरी पत्त्याचे अड्डे हुंगायला.

**चंदू :** पत्ते? परवाच्या प्रकरणानंतर पुन्हा पत्ते? शांतम् पापम्! त्या दिवशींचा दादासाहेबांचा राक्षसावतार बघून आमचे दोस्त इतके घाबरले आहेत म्हणतेस कीं हाय खाऊन त्यांनीं माझं नांवच टाकलंय्. बाकी त्याचा एक फायदा मात्र झाला.

**शकू :** कसला फायदा?

**चंदू :** तीनपानींत जेवढे पैसे मी हरलों तेवढेदेखील मागायला घरीं यायची कोणाची छाती उरली नाहीं.

**जीजी :** अजून कसे आले नाहींत ग हे? *(खिडकींतून पाहतात.)*

**शकू :** अग गाडी तर स्टेशनवर यायला नको का?

**चंदू :** कोण यायचे आहेत?

**जीजी :** *(विस्मयानें)* ही दाराशीं गर्दी कसली रे? कोण माणसं जमा झालींत? रावजी—

**चंदू :** हाक मारायची कांहीं गरज नाहीं. हिज हायनेस तीर्थरूप दादासाहेबांचे पाहुणे आहेत ती मंडळी.

**शकू :** कोणती मंडळी? बघूं दे मला? *(खिडकींतून पाहते.)*

**जीजी :** पाहुणे? यांचे पाहुणे?

**शकू :** असला कसला रे तुझा फाजीलपणा? पांचपंचवीस भिकारी तर दाराशीं गोळा झालेले दिसताहेत.

**चंदू :** तीच आपली आजची पाहुणे मंडळी आहेत.

**जीजी :** डोकं ठिकाणावर आहे ना तुझं? चेष्टेला कांहीं काळ वेळ आहे कीं नाहीं?

**चंदू :** चेष्टा? कोण म्हणतो ही चेष्टा आहे म्हणून? शब्द परत घे आधीं. ही ही दादासाहेबांनीं सांगितलेली कामगिरी आहे समजलीस?

**जीजी :** यांनीं काय तुला दाराशीं भिकाऱ्यांचा तांडा जमवायला सांगितला होता होय?

**चंदू :** हां हां जीजी, अमर्यादा होतं आहे ही. इतक्यांतच या सगळ्या मंडळींची भिकारी म्हणून संभावना करूं नकोस.

**जीजी :** भिकारी नको म्हणूं तर काय पुजारी म्हणूं?

**चंदू :** ऐक. या मंडळींतच आमचे फरारी काकासाहेब असण्याचा दाट संभव निर्माण झाला आहे. तुम्हांला कल्पना नाहीं, पण गेले आठ दिवस मी आपल्या गांवांतील समस्त भिकारी बंधूंशीं अत्यंत पूज्यभावानं आणि नम्रतेनं वागतों आहें समजलांत?

**शकू :** या भिकाऱ्यांत आपले काका? वेड लागलंय् झालं तुला.

**चंदू :** रॉयल ऑर्डर आहे बरं का ही शकू. आपण आहोंत हुकमाचे ताबेदार. एकदा दादासाहेबांच्या चरणावर या सर्व पाहुणेमंडळींना घातलं म्हणजे मी सुटलो.

**जीजी :** ते सांगतात आणि तूं ऐकतोस. आधीं हुसक पाहूं त्या भिकाऱ्यांना. तसा नाहीं तूं ऐकायचास. अरे रावजी—

**चंदू :** अग पण—

**जीजी :** पण नाहीं अन् बीण नाही. रावजी—*(रावजी येतो.)* दारासमोर जमलेल्या सगळ्या भिकाऱ्यांना हुसकून दे बघूं.

**चंदू :** अरे निदान एक एक पैसा तरी हातावर ठेवून मग बोळवण करा सगळ्या काकासाहेबांची. *(रावजी जातो.)* बाकी दादासाहेबांनीं दिलेल्या वर्णनावरून या गर्दीमधें आमचे काका असण्याचा संभव बेताचाच आहे.

**शकू :** जसं कांहीं काकांना तूं बघितलंच आहेस.

**जीजी :** यांना तो भास झालेल्या दिवसापासून फारच करायला लागले आहेत अगदीं हे.

**चंदू :** अग, प्रत्यक्ष बघायला कशाला हवं? या भिकाऱ्यांची सुरत तरी पाहा एकदा? एकादा तरी चेहरामोहरा आपल्या घराण्याच्या वळणावर गेलेला दिसतोय का? नाहीं, तसे आपल्या घराण्यांतले सगळेच पुरुष कांहीं राजबिंडे दिसतात असं नाहीं. पण—

**शकू** : तुला बघितलं म्हणजे त्याची खात्रीच पटते.

**चंदू** : अग पण अगदींच 'गरिबाला पैसा दे भगवान' छाप चेहरा आहे का कोणाचा आपल्या घरांत? दादांना हवा होता इतक्या ओंगळ अवताराचा एक सुद्धां भिकारी आख्या चांदणींत कुठं जाहिरात देऊन देखील मिळाला नाहीं.

**जीजी** : कांहींतरी उद्योग असतात तुझे. जाहिरात द्यायचा हा फाजीलपणा कोणीं सांगितला रे तुला?

**चंदू** : कोणी म्हणजे दादांनीं. नाहीं, पण गंमत सांगतों एक जीजी, अलिकडे भिकारीदेखील अपटुडेट झाले आहेत. नाहीं, मी चांगला सांगतोंय कीं "मी सांगतों तसला मेक-अप करा आणि वाड्यावर चला" पण एक देखील चोर तयार होईना.

**शकू** : दादांनीं काय तुला सोंगं सजवून आण म्हणून सांगितलं होतं होय रे?

**चंदू** : त्यांनीं नव्हतं ग सांगितलं. पण माझी आपली एक युक्ति. म्हटलं तेवढ्यानं झालं समाधान दादांचं तर चार दिवस घरांत तरी शांतता नांदेल. सगळ्या भिकाऱ्यांच्याकडून मीं गाणीं म्हणवून घेतलीं. पण 'गरिबाला पैसा दे भगवान' असली अळणी ओळ म्हणायला एक देखील भिकारी तयार होईल तर शपथ. सगळेच बेटे 'मीरा के प्रभु'वाले निघाले.

**जीजी** : म्हणून त्यांचा जलसा करण्यासाठीं इथं हा गोतावळा आणला होतास वाटतं? बावड्याच्या सावकारांनीं पाहिला असता हा प्रकार म्हणजे सगळ्यांचीच शोभा झाली असती.

**चंदू** : बावड्याचे सावकार? म्हणजे? सावकार कशाला येणार आहेत?

**जीजी** : दिवसभर तूं उंडारत जा बाहेर. तुला कशाला काय माहीत असेल घरांत काय चाललंय् तें?

**शकू** : बापूला मुलगी दाखवायसाठीं घेऊन येणार आहेत सावकार, हें माहीत नाहीं होय रे तुला?

**चंदू** : *(चकित होऊन)* बापूसाठीं? मुलगी? म्हणजे?

**जीजी** : कां? त्यांत एवढं आश्चर्य वाटायला काय झालं? बापूच्या लग्नाचा विचार चाललाय घरांत तें ठाऊक नाहीं का तुला?

**चंदू :** ठाऊक आहे. पण—*(गोंधळून)* आतां तें कसं शक्य आहे?

**शकू :** कसं शक्य आहे म्हणजे? शक्य नसायला काय झालं?

**चंदू :** नाहीं पण—*(घुटमळून)* बापूला माहीत आहे? तो तयार आहे का मुलगी पाहायला?

**जीजी :** तयार नसायला काय झालं? जन्मभर काय लग्नाशिवायच का राहणार आहे तो?

**चंदू :** तसं नव्हे, पण—*(तेवढ्यांत 'पिया बिन नहि आवत चैन' अशी ओळ गात लकेर घेत बापूराव कोठें बाहेर जाण्याच्या गडबडींत प्रवेशतात.)*

**जीजी :** *(चंदूला)* पण काय?

**चंदू :** काय तें तूं आतां बापूलाच विचार. *(गडबडीनें आंत सटकतो.)*

**बापू :** *(तंद्रींतच हातवारे करीत लगबगीने जाऊं लागत)* मी त्या आपल्या इकडं जाऊन यांना भेटून येतों बरं का जीजी.

**शकू :** इकडं म्हणजे रोशनबाईच्याकडेच ना?

**जीजी :** कांहीं जायचं नाहीं तिकडं आज तरी.

**बापू :** जायचं नाहीं म्हणजे? वा. आग्रेवाले खांसाहेब आले आहेत आज. केवढी मोठी बैठक व्हायची आहे तिकडं, आणि—

**जीजी :** *(रागानें)* कळलं! पुरे झालं! समजलं मला! तरीदेखील आज जायचं नाहीं. आलं लक्षांत?

**बापू :** म्हणजे मी नाहीं समजलों?

**शकू :** अरे बावड्याहून बाबा महाराज यायचे आहेत नव्हे का? दादा त्यांना आणायला स्टेशनवर गेले आहेत. इतक्यांत येतीलसुद्धां ती मंडळी वाड्यावर.

**बापू :** *(बुचकळ्यांत पडून)* बाबा महाराज? हां हां, त्या जमिनीच्या प्रकरणांत येणार असतील ते—

**शकू :** बघ जीजी कसा आहे तो. जणूं आपण कांहीं त्या गांवचेच नाहीं असं दाखवतोय.

**जीजी :** तरी मी काल त्याला तासभर पढवत होतें म्हणून बरं आहे.

**बापू :** *(एकदम डोक्यांत चक्क प्रकाश पडून)* ओ, आय सी·! म्हणजे त्या मुलीबद्दल. *(हसून)* काय गाढव आहें मी! साफ विसरलोंच होतों मी. त्याची ही तयारी चालली आहे वाटतं? छान! चांगलाच घोटाळा झाला असता. *(विचार करून)* मग काय ठरवलं आहे तुम्हीं ?

**जीजी :** आम्ही काय ठरविणार? मुलगी पाहून तुझं तूंच ठरवायचं आहेस. मुलगी पाहायला तरी थांबणार आहेस ना ?

**बापू :** तोंच विचार करतों आहें मी.

**जीजी :** म्हणजे ?

**बापू :** तुमचं हें पाहणं बिहणं काय चालणार असेल तें उरकून घ्या. आम्ही रोशनकडंच बसूं आज.

**जीजी :** *(क्रोधानें)* कांहीं जिवाला लाज वाटते का ? डोकं ठिकाणावर आहे ना तुझं? म्हणे आम्ही रोशनकडंच आज बसूं. लग्न तुझं व्हायचं आहे. मुलगी तुला पाहायची आहे.

**बापू :** *(थंड उपहासानें)* असं दादांच्या बोलण्यांत कांहीं आलं नव्हतं.

**जीजी :** म्हणजे ? त्यांनीं तुला कांहीं सांगितलं नव्हतं ?

**बापू :** त्यांनीं काय ठरवून टाकलं आहे तें सांगितलं मला.

**जीजी :** पण मुलीबरोबर संसार तुला करायचा आहे.

**बापू :** *(हसून उपरोधानें)* पुष्कळच सूज्ञपणानं विचार करतां येतो म्हणायचा तुम्हां लोकांना. ठरवलं आहे तुम्हीं, तेव्हां मुलगी पाहण्याचा समारंभ तरी उरकायला तुमचे तुम्ही मोकळे आहांत.

**जीजी :** आणि तिच्या पसंतीबद्दल काय सांगायचं ?

**बापू :** मला विचारणार असलांत तर नापसंत म्हणून सांगायचं.

**शकू :** *(चाकित होऊन)* नापसंत म्हणून कळवायचं ?

**जीजी :** *(रागानें)* म्हणजे ? मी नाहीं समजलें तुझ्या बोलण्याचा अर्थ ?

**बापू :** *(थंडपणानें)* आपण बोलूं सवडीनं कधींतरी या विषयावर.

**जीजी :** *(बापूराव जाऊं लागतात तेव्हां हुकमी आवाजांत)* बापू , मागं फीर.

**बापू :** *(थबकून हसत)* वा, तुलासुद्धां जमायला लागलं कीं.

**जीजी :** काय ?

**बापू :** दुसऱ्याला हुकूम देणं ?

**जीजी :** ही थट्टेची वेळ नव्हे.

**बापू :** मला थट्टा करतांच येत नाहीं मुळीं. तुम्हीं लोकांनीं मात्र माझी थट्टा चालवलीय या लग्नाच्या प्रकरणांत.

**रावजी :** तुझा विचार तरी काय आहे ?

**बापू :** कांहीं फारसा वेडावाकडा नाहीं. रोशनच्या घरीं जाऊन आज पूरिया धनाश्री ऐकायचा ठरवलाय खांसाहेबांचा.

**शकू :** तुला सरळ बोलतांच येत नाहीं का रे बापू ?

**बापू :** *(तिच्याकडे वळून कडक उपहासानें)* तुझ्या लग्नाचे वारे या घरांत वाहूं लागले म्हणजे तुझ्याकडं येऊन शिकेन मी, सरळ कसं बोलायचं तें,—बरं का शकू ? जाऊं ?

**जीजी :** मागं फीर. मी तुला जाऊं देणार नाहीं.

**बापू :** मला थांबवून घेतलंस तर तुला पश्चात्तापाची पाळी येईल. *(क्षणभर दोघेंहि एकमेकाकडे रोखून पाहूं लागतात. तोंच बाहेरून दादासाहेबांची क्रोधाविष्ट गर्जना ऐकूं येते. "...कुठं आहे तो हरामजादा ? बेचाळीस पिढ्यांचा चांगला उद्धार केला कारट्यानं. बसला असेल तोंड काळं करून कुठं तरी पाताळांत...")*

**शकू :** *(घाबरून थरथरते. हातांतली फुलदाणी पडते.)* अगबाई, दादा... *(घाबरून धडपडत गडबडीनें आंत पळून जाते.)*

**जीजी :** *(भेदरून)* काय भानगड झाली आणखी ? *(तेवढ्यांत दादासाहेब तावातावानें प्रवेशतात. मागोमाग भयभीत पंत येतात. बापूला पाहतांच दादासाहेब एकदम थबकतात.)*

**दादा :** *(क्रोधानें)* हे पाहा इथंच उभे आहेत दिवटे चिरंजीव. करून सवरून आतां आईच्या पाठीशीं दडताहेत.

**बापू :** *(थंडपणानें)* आईच्या पाठीशीं दडायला असं कोणतं पाप केलंय् मीं? चांगला समोर उभा आहें मी तुमच्या.

**दादा :** पाहा पाहा पंत. ऐका ऐका हीं मुक्ताफळं. सांगा त्याचा अपराध! मारा तो पापाचा पुरावा त्याच्या थोबाडावर!

**जीजी :** पण असं झालं काय?

**दादा :** असं झालं काय? आतां आणखी काय व्हायचं राहिलंय? लोकांनीं आमच्या तोंडाला डांबर फासायचं तेवढं बाकी उरलंय. वाचा, वाचा हें पत्र. सावकारांनीं शेण घातलंय तुमच्या आणि आमच्या तोंडांत. *(हातांतलें पत्र जीजींच्या अंगावर फेकतात. जीजी भीत भीत वाकून उचलून घेतात.)*

**पंत :** बापूरावांनीं रोशनशीं लग्न केल्याची बातमी समजली म्हणून सावकारांनीं यायचा बेत रद्द केला, वहिनीसाहेब.

**जीजी :** *(धक्का बसून)* काय? बापूनं लग्न?...खोटं आहे हें.

**पंत :** *(बापूला डोळ्यांनीं खुणावत)* मी तरी तेंच म्हणतों. कोणीतरी कांहींतरी बाजारगप्पा उठवतात झालं. ही बातमी खोटी आहे असं बापूरावांनींच सावकारांना कळवावं म्हणजे प्रश्नच मिटला.

**जीजी :** *(अधीरतेनें)* सांग, सांग बापू—खोटं आहे हें. होय ना?

**दादा :** बोल, बोल, आतां कां बत्तिशी मिटली?

**जीजी :** मी सांगतें. ही बातमी साफ खोटी आहे. माझा बापू असलं कांहीं करायचा नाहीं याची मला खात्री आहे.

**बापू :** *(थंडपणें)* माझ्याबद्दल भलता निर्वाळा तूं देऊं नकोस जीजी.

**जीजी :** *(धक्का बसून)* म्हणजे? बापू तूं...तूं...खरंच, बापू तूं लग्न केलंस? रोशनशीं लग्न केलंस?

**बापू :** होय, जीजी. मीं रोशनशीं लग्न केलं. अगदीं खरी आहे ती गोष्ट. सहा महिने झाले या घटनेला. म्हणूनच मी आज मुलगी पाहायला तयार नव्हतों, समजलीस?

**दादा :** झालं? पटली खात्री? आतां प्रश्नच संपला. तुम्हांला आपल्या चिरंजीवांचा मोठा अभिमान, मोठा विश्वास; चांगला या टोकापासून त्या टोकापर्यंत

गळा कापला ना तुमचा? आपल्या पोटीं अलौकिक कुलदीपक जन्माला आले आहेत या समजुतीनं जन्मभर लाड केलेत पोरांचे. भोगा त्याचीं हीं फळं.

**जीजी :** *(विव्हल होत)* बापू....बापू...तूं हें काय केलंस?

**बापू :** मला जें योग्य वाटलं तेंच केलं मीं जीजी.

**दादा :** घराण्यांत आजपर्यंत कोणीं केला नाहीं तो अद्‌भुत पराक्रम केला आहे चिरंजीवांनीं. जा जा, बघत काय उभे राहिलां आहांत? पंचारती आणा त्याला ओवाळायला.

**बापू :** खरं बोललांत दादा. मीं पराक्रम केला आहे कीं नाहीं हें नाहीं मला सांगतां यायचं. पण या घराण्यांतल्या माझ्या वाडवडिलांना नायकिणीच्या मुलीशीं लग्न करायचा नीतिधर्म मात्र कधीं आजवर सुचला नाहीं.

**दादा :** नीतिधर्म?

**बापू :** नीतिधर्मच नाहीं तर काय? आपल्या वाडवडिलांचीं चरित्रं शोधून पाहा, म्हणजे कळेल तुम्हांला कीं आपल्या प्रत्येक पूर्वजानं घरच्या बायकोचा छळ करून नायकिणींचे उंबरठे झिजविण्यांत आपल्या हयाती घालविल्या आहेत हयाती.

**दादा :** *(भडकून)* अरे मूर्तिमंत शुद्ध चारित्र्याचा तुझा बाप तुझ्यासमोर उभा असतांना असले उद्गार काढतांना तुला शरम नाहीं वाटत?

**बापू :** तितक्याच शुद्ध चारित्र्याचा मी तुमचा मुलगा तुमच्यापुढें उभा आहें. मी रोशनशीं लग्न केलंय. तिला रखेली म्हणून नाहीं ठेवलेली.

**दादा :** दोन वेळच्या जेवणाची भ्रांत पडली म्हणजे आपोआप उतरेल ही लग्नाची मिजास.

**बापू :** भ्रम आहे हा तुमचा. तुमच्यासारख्या करारी पित्याचा मी मुलगा आहें हें विसरूं नका. उपाशी पोटीं रस्त्यावर टांचा घासून मी प्राण सोडीन एकवेळ, पण तुमच्यापुढें कधीं तोंड वेंगाडणार नाहीं.

**दादा :** इतकी मस्ती आहे तर आजच्या आज चालता हो घरांतून. पुन्हा कधीं तोंड दाखवूं नकोस मला आपलं.

**बापू :** जशी आपली आज्ञा. करतों मी तयारी. *(ताडकन् पाठ फिरवून जिन्यानें वर चालता होतो.)*

**जीजी :** *(विव्हलतेनें)* बापू...बापू...मी काय सांगतें तें ऐक...बापू...*(जीजी आंत जातात.)*

**दादा :** *(तो गेलेल्या दिशेकडे पहात राहातात. क्षणभरानें)* मस्तवाल. काय ताठा आहे पाहा. *(क्षणभरानें सुस्कारून)* कोणत्या उमेदींत मी होतों आणि घडलं काय? भविष्यांत काय काय पाहणं नशिबांत आहे कांहीं समजत नाहीं.

**पंत :** *(भीत भीत)* आपण मनाचा उगाच क्षोभ करून घेतां रावसाहेब.

**दादा :** पंत, बापूला तुम्हीं पुरता ओळखला नाहींत अजून. बडेभय्यांच्या पिशाच्चानं त्याला पुरेपूर झपाटलं आहे. जे जे वेडे छंद आम्हीं आमच्या रक्तांतून खणून, जाळून पोळून नाहींसे केले, ते पुन्हा त्याच्या रक्तांत उपटले आहेत. आतां त्याची धडगत आम्हांला दिसत नाहीं.

**पंत :** रावसाहेब, थोडं स्पष्ट बोलूं का? आपण रागावणार नसाल तर—

**दादा :** बोला पंत, अगदीं खुल्या दिलानं बोला. आतां आमच्या रागाच्यादेखील कांहीं उपयोग उरला नाहीं.

**पंत :** मीं बारीक माहिती काढली आहे तशी. म्हणजे आपल्या त्या मुलीबद्दल म्हणतोंय मी. तशी ती कांहीं वाईट नाहीं. म्हणजे चालचलणूक वागणूक अगदीं गरत्या मुलीसारखी आहे. म्हणजे मी कधीं त्या माडींत गेलों नाहीं हो. पण आपले चार लोक सांगतात तें—

**दादा :** तें ठाऊक आहे मला.

**पंत :** शिवाय तिच्या आईजवळ बरीच माया आहे असं ऐकलं. म्हणजे लोक बोलतात हो, मी कधी गेलों नाहीं त्या माडीकडे.

**दादा :** बरं मग? म्हणणं काय तुमचं?

**पंत :** तसं नव्हे, पण यापेक्षां सावकार तरी जास्त काय करणार होते?

**दादा :** काय बोलतां आहांत काय तुम्ही पंत? पोराच्या लग्नाचा आम्ही बाजार मांडला आहे असं का समजलांत तुम्ही?

**पंत :** *(सर्द होऊन)* नाहीं म्हणजे माझी कल्पाना...आपलं...वाटलं मला कीं...

**दादा :** काय वाटलं तुम्हांला? सावकारांच्या पैशावर लक्ष ठेवून का आम्ही बापूचं लग्न करणार होतों?

**पंत :** नाहीं म्हणजे....

**दादा :** पंत, तुम्ही देखील आम्हांला ओळखलं नाहीं अजून. खानदानी घराण्यांतली मुलगी या घरांत आली असती तर बापूच्या वेड्या छंदाला लगाम बसले असते, असा आमचा अगदीं सीधा हिशेब होता.

**पंत :** तो हिशेब या लग्नानंदेखील कांहीं फार चुकला आहे असं मला वाटत नाहीं.

**दादा :** भ्रम आहे तुमचा हा पंत. ती पोर गाणं चांगलं गात असेल, पण गाणं निराळं आणि संसार निराळा. त्यांतून हा पोरगा कलेचा वेडा. कलावेड्या पतीचा संसार उभारणं ही सुळावरची पोळी आहे समजलांत? आमच्या आईला तें कधींच जमलं नाहीं. तिच्या आयुष्याची माती माती झाली असल्या नवऱ्याच्या संसारांत. पंत, लग्नांतल्या निष्ठा कधीं कोणा कलावंताच्या छंदी मनाला पेलल्या आहेत का?

**पंत :** बडेभय्यांची गोष्ट निराळी होती. तसं कांहीं बापूरावांचं होईल असं आपल्याला कां वाटलं? बापूरावांनीं आपण होऊन आपल्या पसंतीची मुलगी निवडली आहे. शिवाय दोघांनाहि एकच गाण्याचा छंद—

**दादा :** होय. त्याचं लग्न झालंय्. त्याच्या मनासारखं झालंय्. पण आतां त्याच्या संसाराचं काय होणार याचं चित्र स्पष्टपणें आमच्या डोळ्यांसमोर दिसतंय्. गाण्याच्या मस्तींत आणि धुंदींत तो कलंदराप्रमाणें वागूं लागणार. कोणास ठाऊक? एक दिवस त्यालाहि एकादी मेहरजान भेटेल; आणि तिच्या माडींत दिवसरात्र मैफली झडवीत तो पडून राहील. गाण्याच्या मस्तींतच दारूची चटक त्याला लागेल; आणि मग घरींदारीं बेशुद्ध जिण्याला ऊत येईल. कालांतरानें घरांत छोटा बाळ जन्माला येईल. बाळ हिंडता फिरता झाला म्हणजे त्या पोरालाच रात्रीं अपरात्रीं आपल्या बापाला शोधून आणावा लागेल. कधीं उकिरड्यांतून तर कधी रंगमहालांतून. दिवसभर घरांत काबाडकष्ट करून शिणलेल्या बायकोला व्यसनी नवऱ्याची सगळी सेवाचाकरी मुकाट्यानं करावी लागणार. तरी देखील तिला तो मारणार, झोडपणार! तिचे दागदागिने विकून टाकून तो तिलाहि कंगाल करणार. त्याच्या व्यसनाला लागणारा पैसा तिनं पुरवला नाहीं तर तो तिला भाजणार, डागणार. गुरासारख्या आईच्या मुखांतून निघणाऱ्या किंकाळ्या ऐकून छोटा बाळ त्वेषानं आपल्या चिमुकल्या शक्तीनं बापाला निवारूं लागला तर त्यालाहि तो

फोडून काढण्यास कमी करणार नाहीं. अपरात्रीपर्यंत उपाशी तिष्ठत बसलेल्या आईचा कळवळा येऊन बाळ कोणा बयेच्या माडीच्या जिन्याच्या पायरीवर अंधारांत पेंगत बापाला घरीं नेण्यासाठीं वाट पाहत बसला आहे. माडीवर गाण्याची मैफल रंगांत आली आहे. षौकिन खुषींत माना डोलावत पिंगा घालूं लागले आहेत. 'बहोत अच्छा...खाशी...वा वा...' जल्लोष चालला आहे. बाळ मात्र अंधारांत पायरीवर जळफळत फणफणत बसला आहे. कोंबड्यासारख्या माना झुंजविणाऱ्या माणसांचा त्याला संताप आला आहे. बापाच्या 'आ ऊ'चा त्याला तिटकारा आला आहे. असं या 'आ ऊ' त आहे तरी काय, कीं शहाण्यासुरत्या माणसांनीं रात्र रात्र माना घोळवत तें जागत ऐकत बसावं? त्यासाठीं वेड व्हावं? तें ऐकून जागच्या जागीं उन्मादानं नाचूं लागावं? हा सारंगीया कसल्या मस्तींत आपली बोटं सारंगीवर घासत बसला आहे? हा तबलजी पालथ्या हंडीप्रमाणं दिसणारीं हीं दोन भांडीं कां बडवीत सुटला आहे? —असं पायरीवर तिष्ठत बसलेला बाळ मनाशीं आश्चर्यानं विचारूं लागेल. मग तो देखील बापाबद्दल बोलतांना तिरस्कारानं म्हणूं लागेल कीं 'माझा बाप मला मेला. त्याचं तोंड देखील मी पाहणार नाहीं.' कुठं गाणं ऐकलं कीं त्याच्याहि तळपायाची आग मस्तकाला जाईल, आणि तोहि म्हणूं लागेल कीं हें गाणंबजावणं कायद्यानं बंद केलं पाहिजे...

*(प्रक्षोभ अनावर होऊन शब्द ओठांतच गोठतात. क्षणभरानें करुणार्ततेनें)* ...हें सारं आम्हीं तेव्हां सोसलं. मस्तक फुटायची पाळी आली होती तरी तरुणपणाच्या उमेदीनं भविष्यावर नजर ठेऊन आम्हीं दैवाचे सगळे सोहाळे सहन केले. पण भविष्याला पुन्हा त्याच विषाची पालवी फुटलेली जेव्हां आम्हीं पाहिली, तेव्हां मात्र आम्ही खचलों...दामू! *(क्षणभर थांबून)* दामूची ती तशी दशा झाली. या पोरानं ही अशी अवस्था करून घेतली.

*(पंत हलकेच निघून जातात. दादासाहेब शेवटचें वाक्य बोलत असतांनाच पार्श्वसंगीत सुरू होतें. पांढरा प्रकाश मावळतो आणि निळ्या प्रकाशानें रंगभूमि उजळते. बांसरीचे स्वर ऐकूं येतात. त्याबरोबर दादासाहेब कावरेबावरे होतात. बासरीचे स्वर संपून 'गरिबाला पैसा दे भगवान' हें खुळ्या दामूचें गाणें ऐकूं येतें. दादासाहेब अधीर होऊन शोधूं लागतात. दामू पूर्वीप्रमाणें गात नाचत खिडकींतून प्रवेशतो. दादासाहेबांना*

*पाहतांच तो एकदम थबकतो. दादासाहेब अत्यानंदानें "दामू, दाम्या, तूं —तूं आलास? परत आलास?" असें म्हणत त्याला कडकडून भेटतात. मग त्याला सोडून नखशिखांत न्याहाळत त्याचें सगळें अंग सुरक्षित आहे याची खात्री करून घेतात.)*

**दादा :** अरे, होतास कुठं तूं इतके दिवस? किती शोधलं आम्हीं सगळ्यांनीं तुला? उन्हातान्हांत कुठं कुठं पायपीट केली आम्हीं तुझ्यासाठीं आं? चांगलं बोलतां बोलतां मध्येंच रे काय लहर आली तुला पळून जाण्याची? *(त्याला न्याहाळत)* लाज वाटली तुला घरांत यायची होय ना? *(हसून वत्सलतेनें)* वेडा रे वेडा! अरे, फाटका पोशाख आणि गबाळ अवतार असला म्हणून काय झालं? माणसं का अवतारावर नि कपड्यावर माया करतात? गुलामा, हीच का आमची पारख केलीस तूं? छे बोवा, हें नाहीं आम्हांला पसंत. काय समजलं? असला वेडेपणा आम्हांला मंजूर नाहीं. दाम्या, अरे तुझ्या हक्काचं आहे घर हें. होय, आपल्या हक्काचं आहे हें घर. *(पुन्हा न्याहाळून)* ओळखलं बरं का आम्ही. तुला काय वाटलं तें आलं आमच्या लक्षांत. सांगूं? आईचा उल्लेख करून तुला या घरांत कोणी हिणवतील अशी तुला भीति वाटली होय ना? खुळा आहेस झालं. अरे मग मला सांगायचं नाहीं का तसं? का आपलं एकदम पळून जायचं? अरे, या घरांत आम्ही डोंगरासारखे तुझ्या पाठीशीं उभे असतांना तुला हिणवायला कोणी धजेल? काय बिशाद आहे? *(पुन्हा न्याहाळत)* थांब, तशी नाहीं तुझी भीति जायची. सगळ्या माणसांची आम्ही जातीनंच तुझी ओळख करून देतों. पंत, अहो पंत—*(भासचित्रांत पंत यांत्रिक रीतीनें पुतळ्यासारखे येतात.)* घरांतल्या सगळ्या माणसांना बोलावून आणा पाहूं. सगळ्यांना बरं का. माझा हुकूम आहे म्हणून सांगा. *(पंत जातात. शेवटचे उद्गार दादासाहेब दरडावून काढतात. त्याबरोबर दामू भेदरून लटलट कांपूं लागतो. तें पाहून त्याला कुरवाळत)* ए वेड्या, अरे, हा हुकूम घरांतल्या माणसांना आहे. तुला नाहीं. मोठा चमत्कारिकच दिसतोस तूं. तुझ्यासमोर दुसऱ्या कोणाला दरडावायचंदेखील नाहीं? म्हणजे जुलूम झाला. अरे दामूराव मग हें घर चालायचं कसं? अरे, आम्ही सारखे दरडावीत असतों म्हणून तर हा प्रपंच उभा आहे. खोटं नाहीं दाम्या, नाहींतर केव्हांच या वाड्यावरून गाढवाचे नांगर फिरले असते. *(दाम्या आपल्या झोळींत हात घालून कांहीं चाळवाचाळव*

*करू लागतो. तें पाहून)* काय आहे त्या झोळींत? *(हसून)* भाकरीचे तुकडेच्च ना? नाहीं? मग बघूं दे कीं एकदां कसली दौलत राखली आहेस त्या झोळींत ती? बघूं बघूं? *(झोळात हात घालून बांसरी काढतात.)* हत् वेड्या. बांसरी का होती? मग ती लपवायची कशाला एवढी? आम्हांला घाबरलास, होय ना? घाबरायचं काय कारण आहे आतां तुला? पूर्वीची आठवण झाली वाटतं? तूं म्हणजे बोवा फारच...अरे असा किती दिवस उगाळणार आहेस तो प्रकार? तुला आम्ही त्यावेळीं संतापाच्या भरांत मारलं. चुकलं आमचं. पण तें किती दिवस उगाळायचं? किती दिवस आम्हांला त्यासाठीं अशी टोंचणी द्यायची? दाम्या, अरे आम्हांला बांसरी आवडत नाहीं असं वाटलं का तुला? तुलाच कां, सगळ्यांनाच वाटतं कीं जेवढं म्हणून कांहीं सुंदर आहे तेवढं आम्हांला वर्ज्य आहे. एखाद्या हिंस्र जनावराप्रमाणं माणसं आम्हांला दूर ठेवतात. अरे, आम्हांला माणसाचं हृदय नाहीं का मन नाहीं? दाम्या, आमच्या सगळ्या आयुष्याचा हिशेब चुकला. पाठच्या भावंडांना आम्ही मुकलों. पोटच्या पोरांना आम्ही पारखे झालों. सर्वांचं भलं व्हावं म्हणून आम्हीं हा रुद्रावतार धारण केला. पण आतां तो रुद्रावतारच उरलेल्या जन्मांत आम्हांला सोबत करणार असं दिसतं. पण दाम्या, तूं खुळा असलास तरी शहाण्यांच्या बुद्धीला नाहीं तो तुझ्या भाबड्या हृदयाला उमज पडला आहे. होय ना? *(उत्साहानें)* बच्चा, घाबरूं नकोस. पडतील ते कष्ट उपसून तुला आम्ही शहाणें करून सोडूं. आमच्या म्हाताऱ्या मनगटांत अजून तेवढी रग शिल्लक आहे. *(हें भाषण चाललें असताना दामूचे वेडेचार चालले आहेत. खुळा मधच तोंडाला बांसरी लावतो. तें पाहून)* वाजवतोस? *(लडिवाळपणें)* दाम्या, वाजव कीं एकादी गत? ऊं? अगदीं दिलखुलासपणें आम्हांला विसरून जाऊन बांसरी वाजीव. तूं विसरलास, म्हणजे तेवढेच दोन क्षण आम्ही आम्हांला विसरूं. आमच्यासमोर वाजवायला लाज वाटते का? तसें असलें तर आम्ही पाठ करून बसतो तुझ्याकडे. मग तर झालं. *(पाठ करून बसून क्षणभर वाट बघून)* कां? नाहीं मर्जी लागत? बरं राहूं दे. पुन्हा केव्हां तरी. मी कांहीं तुला दरडावीत नाहीं. असा भयभीत नको होऊंस. ही पाहा बांसरी परत टाकली तुझ्या झोळींत. झालं समाधान? हीं बघ आपलीं माणसं आलीं. कशी शिस्त लावली आहे मीं घराला पाहा. *(घरांतलीं सगळीं माणसें लष्करी थाटांत येऊन समोर रांगेंत उभीं राहतात. समंध भासचित्रांत तीं बोलत नाहींत. मूक अभिनय, तोहि जरूर

*तेथेंच. एरव्हीं हीं पात्रें पुतळ्यासारखीं स्थिर उभीं असतात.)* ये इकडं असा. घाबरूं नकोस. अरे ही कांहीं कोणी परकी माणसं नाहींत. *(बोट दाखवीत)* याला ओळखतोस तूं? अरे, हा रावजी नाहीं का? याच्या अंगाखांद्या-वर खेळला होतास तूं लहानपणीं. मोठा इमानी माणूस बरं कां? पगार वेळेवर द्या न द्या, दोन वेळां कोरड्यास दिलं कीं स्वारी तृप्त असते. अशीं माणसं आतां होणें नाहींत. हे आपले पंत, हे तरी आठवतात का तुला? असा गोरामोरा होऊन बघूं नकोस. वेड्या, ओळखलं नाहींस म्हणून कोणी रागें भरत नाहीं तुला. पण निदान पंतांना तरी तूं विसरायला नको होतंस. अरे, तूं तान्हा होतास त्यावेळीं तुला आम्ही वाड्यावर आणायला निघालों तर त्यावेळीं सगळ्या नातेवाइकांनीं आम्हांला खुळ्यांत काढलं होतं. पण आमच्या पाठीशीं उभे होते एकटे पंत. पंतांच्या अवतारावरून आणि त्यांच्या अघळपघळ बोलण्यावरून त्यांची किमत करूं नकोस हो. अरे, ज्या वेळीं मी मी म्हणणारे अकलेचे खंदक रिकामे पडले त्या वेळीं पंतांचा सल्लाच आम्हांला उपयोगी पडला आहे, समजलास?...हिला तरी ओळखलंस का? नाहीं? अरे, ही तुझी वहिनी नव्हे का? छे छे, दाम्या, अगदींच रिकाम्या डोक्याचा आहेस बघ तूं—सारं कांहीं तूं विसरलास. अरे तुझ्यासाठीं हिनं किती खस्ता खाल्या—तूं आपला आम्हीं दिलेला चोप तेवढा घोळत बसला आहेस. हा बापू, हा चंदू, ही शकू, यांना कांहीं तूं पाहिलं नसशील. कसा पाहणार? अरे तूं घरांतून पळालास तेव्हां बापू तान्हा नव्हता का? या मुलांचा तूं काका आहेस काका. *(दाम्याला जवळ घेत प्रेमानें)* तुला गंमत सांगूं का? हा बापू आहे ना—मोठा छान गातो. तसं आम्हांला कांहीं कळत नाहीं या गाण्यांतलं, पण जाणकार सांगतात कीं बापूची तयारी मोठी वाखाणण्यासारखी आहे. आवाज तरी किती गोड आहे म्हणतोस? सही सही बडेभय्यांची आठवण होते पोरगा गायला बसला कीं. *(हसून हलकेच)* अरे, हा पोरगा मेहनतीला बसला की आम्ही तासन्‌तास त्याचं गाणं चोरून ऐकत जिन्यांत उभे असतों. चोरून ऐकूं नको तर काय मैफलींत पोराच्या समोर मांडी ठोकून का बसूं? तूं तरी शहाणाच दिसतोस? अरे, पोरांचे असले छंद मी उघडपणें गोंजारायला लागलों तर तीं नादावायचीं नाहींत का? *(आणि मग घरांतील माणसांच्याकडे वळून)* आणि बरं का मंडळीं, हा कोण तें ओळखलंच असेल तुम्ही? हा आमचा धाकटा भाऊ दामू, बरं का? *(दामूला जवळ घेत)* थोडासा भ्रमिष्ट आहे. पण हळूहळू सुधारेल. आपल्या

शेतवाडीचा कारभार बघायला मला मदतीला कोणीतरी हवाच होता नाहीं का! वर्षाभरांत त्याला असा तयार करतों कीं पाहतच राहाल. *(स्वतःशींच हसतात. सर्व माणसांच्या मुद्रा रोखून पाहातात. सर्वांच्या मुद्रेवर पराकाष्ठेची नाराजी दिसते. ती नाराजी बघून रागानें–)* कां? तोंड वाकडीं करायला रे काय झालं बाबांनो? असल्या ओंगळ अवतारांत दामू घरीं परत आला म्हणून का कपाळाला आठ्या घालतां? असला माणूसघाणेपणा बरा नाहीं. धक्के मारून घालवून दिला याला घरांतून म्हणजे का डोळे निवतील तुमचे? थोडींथोडकीं नाहीं, पंचवीस वर्षें पोरगा कुठं वनवासांत उन्हांत घर बांधून भीक मागत हिंडतोय. तो घरांत परत आला म्हणून आनंदानं नाचायचं कीं अशा सुतकी चेहऱ्यांनं त्याचं स्वागत करायचं? हाच दामू मोटारींतून चांगला छानछोकीच्या पोशाखांत येऊन तुमच्या-पुढं उभा राहिला असता तर त्याचा एक पाट सात ठिकाणीं नाचवला असता तुम्ही लोकांनीं! कांहीं बोलूं नका. तुम्हा सगळ्यांना आम्ही चांगले ओळखून आहोत. नीट कान खोलून ऐका. तुम्हांला याची लाज वाटत असेल तर कोठेंही जायला तुम्हांला चारी दिशा मोकळ्या आहेत. खुशाल जा. सगळे चालते व्हा. आम्ही एकटे दामूला सांभाळूं. एकट्याच्या हिमतीवर आम्ही त्याला परत माणसांत आणून सोडूं समजलांत? तो इथंच राहणार. असा तुमच्या दयेच्या चतकोरावर नव्हे. खुळा असला तरी दामू आमचा भाऊ आहे भाऊ—स्वतःच्या हक्कानं तो इथं राहणार. तुमच्याइतकाच त्याचासुद्धां या घरावर हक्क आहे कीं नाहीं? नीट ध्यानांत घ्या, त्याचा अपमान झालेला आम्हांला बिलकुल खपणार नाहीं. *(तेवढ्यात कोणीतरी फिदफिल्यासारखे हसतं कोणीतरी कसलें? चंदूच हा.— चंदू टवाळीच्या थाटांत हसतो. त्यामुळें दादासाहेब भडकतात...)* कोण कोण तो फिदफिदला? छान—चांगला मान ठेवलात आमच्या शब्दाचा. जा, चालूं लागा. यापुढं तुमचा मार्ग वेगळा, आमचा मार्ग वेगळा. एक शब्द ऐकायचा नाहीं कोणाचा आम्हांला. *(ओरडून)* जा—जा म्हणतों ना—*(त्याबरोबर दामू लटपट कांपूं लागतो. उमसून रडूं लागतो. रडतां रडतां दादासाहेबांचे पाय धरून—)*

**दामू :** दादा, मला मारूं नका...मारूं नका हो मारू नका...वाटल्यास घर सोडतो...पण मारूं नका.

**दादा :** *(कळवळून दामूला चटकन् पोटाशीं घेत)* नाहीं रे दामू. तुला कोणीं

मारीत नाहीं. अरे, तुला येतां जातां बदडायला आम्ही तुझे वैरी का आहोंत? *(सुस्कारून)* त्यावेळचा राग आमच्या म्हाताऱ्या मस्तकांत उरला नाहीं बाबा. अरे, पोरासारखा आम्हीं तुला लहानाचा मोठा केला म्हणून तुझ्यावर आम्हीं त्यावेळीं हात टाकला. अरे, मायेशिवाय कोण कोणावर हात टाकतो? तें इतकं मनाला लावून घ्यायचं? त्यासाठीं असं भ्रमिष्ट व्हायचं? स्वतःची शुद्धबुद्ध-देखील घालवायची? *(घरांतल्या माणसांना)* पाहा पाहा, ऐका जरा—दाम्याचा हा हंबरडा ऐकून कोणाहि माणसाला पाझर फुटला असता. पण तुम्ही माणसं नाहींत. दगड आहांत. जा चालते व्हा. *(हात वर करून)* जा चालते व्हा. चालते व्हा म्हणतों ना?... *(एकदम् अंधार होतो. पार्श्वसंगीत तुटतें. क्षणार्धानें रंगभूमी पुन्हा पांढऱ्या झगझगीत प्रकाशानें उजळते. तों दादासाहेबांचा 'चला चालते व्हा' असें ओरडतांना वर केलेला हात तसाच आहे. पण समोर कोणीच नाहीं. दामू नाहीं की घरांतली कोणी माणसें नाहींत. तें बघून चकारून)* दामू दामू, अरे गेला कुठं हा दामू? पंत, बापू, चंदू... *('काय झालं? काय झालं?' असा गलबला करीत जीजी, बापू आणि पंत धांवत येतात.)*

**पंत** : काय झालं रावसाहेब?

**जीजी** : कोणाला हाक मारीत होतां आपण?

**बापू** : इतक्यांत कोणी आलं होतं का इथं?

**दादा** : *(अधीरतेनें)* दामू कुठं आहे? दामू कुठं आहे? चांडाळांनो, खरं सांगा कुठं पिटाळलांत त्याला? कुठं नाहींसा केलांत?

**पंत** : पिटाळलांत?

**बापू** : नाहींसा केलांत? *(बुचकळ्यांत पडून सगळींच माणसें एकमेकांच्या तोंडाकडे बघूं लागतात.)*

**जीजी** : काय बोलतां आहांत हें आपण?

**दादा** : तुम्हांला सगळ्यांना आम्ही चालते व्हा म्हटलं, त्याचा सूड घेतां आहांत तुम्ही सूड.

**बापू** : सूड? कसला सूड? काय बोलतां आहांत तुम्ही दादा?

**जीजी** : कोणाला चालते व्हा म्हणाला होतां आपण?

**बापू :** मलाच म्हणाले होते दादा की—

**दादा :** दामू कुठं आहे तें सांग मला. कुठं आहे, कुठं आहे तो? इतका वेळ आम्ही त्याच्याशीं इथं बोलत होतों. तुम्हांला आम्हीं इथं बोलावून आणलं. त्याच्याशीं आम्हीं तुमची ओळख—

**जीजी :** काय सांगतां आहात आपण हें? दामूभावोजी? इथं आले होते?

**बापू :** पुन्हा दादांना परवांसारखाच भास झाला असेल.

**दादा :** *(भडकून)* खोटं बोलतो आहेस तूं. एकजात निमकहराम आहांत सगळे. त्या गरीब बिचाऱ्याच्या जिवावर उठलां आहांत तुम्ही—पण याद राखा—

*(तिवढ्यांत बाहेर मोटारचा चारसुरी गोड हॉर्न ऐकूं येतो—लागोपाठ तीनचार वेळ. त्यामुळें सर्वांचेच कान टवकारले जातात.)*

**दादा :** *(चमकून, शून्य दृष्टीनें बघत)* कोण? तो पाहा—कसला आवाज नाहीं ऐकलांत तुम्हीं?

**बापू :** होय...मला वाटतं...*(असें म्हणत खिडकींतून डोकावूं लागतो.)*

**दादा :** *(अधीरतेनें)* मग शंकाच नको. बांसरीचाच आवाज हा. *(पुन्हा हॉर्न)* दामूच्या बांसरीचेच हे सूर. *(पुन्हा हॉर्न)* पंचवीस वर्षं ते सूर रात्रंदिवस घुमताहेत आमच्या कानांत...

**पंत :** पण रावसाहेब...

**बापू :** *(बाहेर व्हरांड्यांत जाऊन बघत)* म्हणजे? मोटार? मोटार कोणाची?

**जीजी :** *(पुढें होऊन बघत)* अगबाई! मोटार का आली आहे कोणाची? आपल्याकडं—?

**बापू :** सावकार तर नाहीं आले मोटारींतून?

**पंत :** *(लगबगीनें पुढें होऊन बघत)* छे छे भलतंच. सावकारांच्यापाशीं कोठली आलीय् मोटार?

**बापू :** पण मग हा चंदू मोटारींत डोकावून बोलतो आहे कोणापाशीं?

**पंत :** शकूताईदेखील तिथंच दिसताहेत—ऊं...छोटूमल मारवाडी तर...

**बापू :** छोटूमल मारवाडी? आणि असल्या गाडींतून? कांहींतरीच तुमचे तर्क. मोटारींतून उतरले पाहा ते. कोणीतरी बडे गृहस्थ दिसतात.

**जीजी :** अरे पण तर्ककुतर्क करीत बसला आहेस त्यापेक्षां पुढं होऊन चौकशी केलीस तर बिघडेल का कांहीं ?

**बापू :** थांब—ही शकूच आली बघ—

**दादा :** *(शून्यमनस्कतेनें)* काय म्हणालांत ? भास ? असेल...असेल...तसंहि असेल. पण छे, अजून खात्री पटत नाहीं.

**जीजी :** *(मागें वळत)* भास नव्हे, खरंच कोणीतरी आलंय् बाहेर मोटारींतून.

**दादा :** आलंय् ? आपल्याकडं ? शंकाच नको. मग तोच तो.

**बापू :** तुम्हीं म्हणतां तसला दामू नव्हे दादा—हे हे कोणीतरी...*(तेवढ्यांत शकू धावत येते. 'जीजी. अग, जीजी' अशी हाक मारीत येते. तिला धाप लागली आहे.)*

**जीजी :** काय झालं ग ?

**शकू :** बघ तरी बाहेर कोण आलं तें ? *(असें म्हणत आंत येते आणि दादांना बघून चपापते.)*

**बापू :** कोण ? कोण आहे ग ?

**जीजी :** आणि धाप लागण्याइतकं धावायला कशाला हवं ?

*(शकू दादांना पाहून बावचळून तशीच उभी राहते. दादा मात्र स्वतःच्याच तंद्रींत आहेत.)*

**बापू :** सांग ना ? कोण आहेत ते गृहस्थ ?

*(शकू चटकन् जीजींच्या कानाशी लागते आणि कांहींतरी सांगते. त्या क्षणीं त्या विस्मयानें थक्क होतात आणि—)*

**जीजी :** काय ? काय म्हणालीस ? दा—छे शक्यच नाहीं.

**शकू :** होय, अग खरंच ! तेच. पंधरा दिवसांपूर्वी मुंबईला आले म्हणाले. ब्रह्मदेशांतून—

**जीजी :** खुळ्यासारखं बोलूं नकोस कांहींतरी यांच्यासमोर—

**शकू :** विचार वाटलं तर चंदूला—

**जीजी :** तो मुलखाचा फाजील. त्यानं केली असेल मघासारखी तुझी चेष्टा.

**शकू :** गळ्याशपथ सांगतें मी. अग माझ्याशीं देखील ते बोलले. गाडींतून उतरतांच दादांची आणि तुझी चौकशी केली त्यांनीं—*(जीजीना हातानें ओढत)* चल ना तूं बाहेर—

**बापू :** पण आलंय तरी कोण बाहेर—?

**जीजी :** मग इतका वेळ बाहेर का उभं करून ठेवायचं त्यांना. शहाणे आहांत झालं तुम्ही एकापेक्षां एक—*(असें म्हणत त्या लगबगीनें जातात.)*

**शकू :** *(तिच्या मागोमाग जात)* अग मोटारींतून सामान काढून घेताहेत ते रावजीकडून तर—*(तेवढ्यांत बापू तिला अडवीत विचारतो—)*

**बापू :** तूं सरळ सांगणार आहेस कीं नाहीं कोण गृहस्थ आले आहेत ते?

**शकू :** *(दादांच्याकडे बघत, घुमटळत)* काका—

**पंत :** माधवकाका?

**शकू :** नव्हे—दामोदरकाका. *(झटकन् जाते.)*

**पंत** आणि **बापू :** *(विस्मयानें थक्क होऊन)* दामोदरकाका? म्हणजे! *एकमेकाकडे बघूं लागतात. पंत लगबगीनें निघून जातात. बापूहि जाऊं लागतो, तोंच—)*

**दादा :** जा—आला असला तर घेऊन या त्याला घरांत. नीट समजूत घालून आणा त्याची. डोक्यावरच्या त्या वेळच्या परिणाम अजून गेला नाहीं त्याच्या. *(भानावर येऊन)* काय म्हणालांत? दामोदर?

**बापू :** पण दादा तुम्ही म्हणतां तो दामू—*(दादा ताडकन् उठतात आणि बाहेर जातात. तोंच चंदू विस्मयानें प्रक्षोभित होऊन प्रवेशतो.)*

**चंदू :** काय ग्रँड कार आहे काकांची! नुसता हॉर्नच वाजवीत राहावंसं वाटतं.

**बापू :** कोण काका घेऊन बसला आहेस तूं चंदू?

**चंदू :** आपले दामोदर काका. नाहीं तर काय? कोठले 'गांवकाका' वाटले होय तुला? कमाल आहे बोवा!

**दादा :** *(परत विमनस्कपणें प्रवेशत)* छे छे! नाहीं, नाहीं! शक्यच नाहीं.

**चंदू :** खरंच दादा—दामोदरकाका आले आहेत. ब्रह्मदेशांतून. निघण्यापूर्वी तार केली होती म्हणाले मुंबईहून, पण...

**बापू :** *(रागानें)* आणि तूं हें आत्तां सांगतो आहेत घरांत. इतका वेळ काय गाडीचा हॉर्न वाजवीत बसला होतास?

**चंदू :** अरे पण काकांचं सामान तरी—*(बापू जातो. चंदूचे शब्द ओठांतच राहातात. मग दादांच्या जवळ जाऊन आदबीनें)* तुम्ही येतां ना दादा? काकांच्या स्वागतासाठीं?

**दादा :** *(दचकून)* काय म्हणालास?

**चंदू :** काका तुमची चौकशी करीत होते. नाही—म्हणजे आम्ही आहोंतच पण ...*(जाऊं लागतो. पुन्हा वळून उत्साहानें)* पण दादा, तो खुळा, तो झोळीवाला तो खोटाच बरं का! तुम्हांला भासच झाला. बघायलाच नको.

**दादा :** *(वर बघत)* ऊं?

**चंदू :** *(एकदम सर्द होऊन)* नाहीं—म्हणजे माझा तर्क आहे आपला तसा. बघा तरी काका किती रुबाबदार दिसतात ते.

*(दादासाहेबांची शून्य मुद्रा पाहून तो पसार होतो. दादासाहेब दिङ्मूढ होऊन डोक्याला हात लावतात. तो भास कीं हा भास?)*

**दादा :** *(क्षणभरानें, स्वतःशींच)* दामोदर...मोटार...ब्रह्मदेश...*(विव्हल होत)* छे छे, दाम्या तूं तो नव्हेस...तूं तो नव्हेस...तूं...तो...

**पडदा**



*[स्थळ : तोच दिवाणखाना. मागील प्रसंगानंतर सुमारें महिन्याचा कालावधि उलटलेला आहे. या महिनाभरांत या घरांत बरींच स्थित्यंतरें झालेलीं असावींत असें दिवाणखान्याच्या बदललेल्या रंगरूपावरून वाटतें. पूर्वीची ती पेशवाई बैठक, तीं जुनाट कपाटें, आणि तो रंग उडालेला गालिचा या सारख्या सर्व वस्तू अन्तर्धान पावल्या आहेत. आतां सर्वत्र अद्ययावत् थाटाचं फर्निचर निसर्ग-देखाव्याच्या सुरेख तसबिरी, सुबक पुतळे, रेडिओ इत्यादि श्रीमंतीचीं आणि रसिकतेचीं सर्व लक्षणें या दिवाणखान्याच्या सजावटींतून व्यक्त होतात. वेळ संध्याकाळची. या नव्या कात टाकलेल्या दिवाणखान्यांत जीजी घाईनें प्रवेशतात आणि खिडकीपाशीं जाऊन बाहेर डोकावतात. जीजींच्या वेशभूषें-तील श्रीमंती अगदीं सहज लक्षांत येते.]*

**जीजी :** *(स्वत:शींच)* सहा वाजले. अजून कशी मंडळी आली नाहींत कोण जाणे. *(मागें वळून बघतात तों कोचावरील अभ्रे वेडेवाकडे झालेले त्यांना दिसतात तें बघून–)* हें काय? हा रावजीचा कारभार असला पाहिजे. रावजी, ए रावजी! *(रावजी 'जी' असें ओरडत प्रवेशतो. त्याचाहि थाट आतां सरकारी कचेरींतील पट्टेवाल्याचा झाला आहे.)* ए शंभो, हें रे काय? *(रावजी जीभ काढीत टीपॉय उचलून झटकीत जागेवर ठेवतो.)* ही काय तुला पेशवाई बैठक वाटली होय? कोच खराब नाहीं का व्हायचे अशानं? *(कोचावर बसतात तोंच पुन्हा उठून)* बाई बाई बाई! अजून महिनासुद्धां झाला नाहीं हा सोफासेट घेऊन. पण इतक्यांत मातेरं करून टाकलं त्याचं.

**रावजी :** मीं काय केलं बाई? रोज इकती मानसं येत्याती वाड्यावर––

**जीजी :** येतात म्हणजे? तीं काय नाचतात वाटतं या कोचावर? भावोजी आहेत म्हणून माणसं येतात. पूर्वी भटाभिक्षुकांच्या खेरीज फिरकत होतं का या वाड्यावर कोणी?

**रावजी :** तसं नवं बाई. मानसांना कोचावर नीट कसं बसायचं ते शिकवाया व्होवं एकदा. खुशाल मांडी घालून बसत्यात काई इसम.

**जीजी :** तूं शाळा काढ आतां एक कसं बसायचं तें शिकवण्यासाठीं.

**रावजी :** भाहिरच्या मानसांचं जाऊ द्या. पन बाई, आपले चंदूराव, त्ये तर पाय तणाउनं दुपारचं झोपत्यात या कोचावर.

**जीजी :** उगीच कांहींतरी बडबडूं नकोस. बिचाऱ्याला वेळ तरी मिळतो का दुपारचं झोपायला?

**रावजी :** हां. तें मात्र खरं बाई! आज सकाळपून चंदुरावांची लई धावाधाव दिसली खरी. खरंच बाई, गेली हायती तरी कुटं संमदी मानसं?

**जीजी :** तूं म्हणजे असा आहेस अगदीं! सगळ्या गांवाला आग लागली तर, हा उजेड कसला म्हणून विचारीत हिंडशील दारोदार.

**रावजी :** तसं न्हवं बाई पर खरंच...

**जीजी :** अरे, भावोजींच्या साखरेच्या कारखान्याचा मूहूर्त समारंभ नाहीं का आज अमरोलीच्या शेतावर!

**रावजी :** अमरोलीच्या शेतावर? अवंऽऽ पर तीं श्येतं...

**जीजी :** आतां सावकाराचीं राहिलीं नाहींत तीं शेतं. भावोजींनीं सोडवून नाहीं का घेतल्या त्या जमिनी? *(खिडकीतून बघत)* खरंच सनळा गांव लोटला असेल अमरोलीच्या शेतावर. केवढी मौज उडाली असेल तिकडे. सगळीं माणसं मजेंत असतील, आणि--*(विषादानें)* आम्ही बसलो आहोंत इथं सुतक्यासारखीं घरांत.

**रावजी :** त्यें कां बाई? आपुन कां मांगं ऱ्हायलात?

**जीजी :** तुझ्या साहेबांची तबियत नाहीं ना ठीक. मग मला नको घरीं राहायला?

**रावजी :** *(विस्मयानें)* तबियत? साहेबांची तबियत? त्येंच्या तब्येतीला काय जालंय? मगा तर देवळांत जाऊन आले न्हवं का?

**जीजी :** तें का मला कळत नाहीं? पण कारखान्याच्या समारंभाला भावोजी बोलवायला आले तेव्हां बिघडली यांची तब्येत. भावोजींना नुसतं पाहिलं तरी आतांशा बिघडायला लागलीय यांची प्रकृति.

**रावजी :** तसं न्हवं, पर म्या पाइलं असतं साहेबांच्याकडं. आपुन गेला असता तरी काई म्या त्येचं कमी पडूं दिलं नसतं.

**जीजी :** कशाला जायचं? माणसांनीं तिथं 'हे कां आले नाहींत?' असं विचारून विचारून मला पुरे पुरे करून सोडलं असतं. सगळ्यांच्या आनंदाचा विरस करण्यापेक्षां आपणच घरीं राहिलेलं बरं नाहीं का?

*(तेवढ्यांन आंतून दादासाहेबांची हाक ऐकूं येते. "रावजी, अरे माझी चाळिशी कुठं कोणीं पाहिली का? कुठं एका जागीं वस्तू ठेवायची सोय उरली नाहीं या घरांत. आमच्या वस्तूंबरोबर आम्हांलाहि एक दिवस अडगळीची खोली दाखवायला कमी करणार नाहींत या घरांतलीं माणसं." असें म्हणत ते प्रवेशतात.)*

**जीजी :** *(फणकाऱ्यानें)* समजतात हीं खोचून केलेलीं बोलणीं, बरं का? अडगळींची खोली काय? इथं दिवाणखान्यांत भावोजींच्याकडं सारखीं माणसं येतात म्हणून वर तिसऱ्या मजल्यावर स्वतंत्र खोली थाटून दिली तुम्हांला. तरी—

**दादा :** *(खोचून)* आम्हांला त्रास नको म्हणून, कीं आमचा त्रास होतो म्हणून तें तुमचं तुम्हालाच ठाऊक. स्वतंत्र खोली थाटून दिलीय म्हणे. ज्या माळ्यावर पूर्वी उंदीर आणि घुशी नाचत होत्या...

**जीजी :** पण तो माळा आता तशा अवस्थेंत राहिलाय का तरी? भावोजींनीं पाण्यासारखा पैसा करून दिवाणखाना बांधला नाहीं का वरती? तरीं भावोजी परोपरीनं तुमचा मान ठेवतात, तुमची तब्येत सांभाळतात म्हणून बरं. तुमचा त्रास होतो असं कोणी एका शब्दानं तरी म्हटलंय् का?

**दादा :** *(उसळून)* म्हणायला कशाला हवं? माणसांच्या वागणुकींतले थारेपालट न कळण्याइतके आम्ही बुद्दू आहोंत असं वाटतं का तुम्हांला? त्याच्या लहानपणीं आम्हीं त्याच्या अंगावर हात उगारला म्हणून सूड घ्यायला परतला आहे घरीं चांडाळ. *(धुसफुसत)* आमची सत्ता, आमचा अधिकार, आमचीं माणसं बळकावून आम्हांला हाकलून द्यायला बघतो आहे. खूप, खूप पाहिले आहेत असले. मोठ्या मिजाशींत मारे घर सोडून पळून गेले होते दिवटे त्या वेळीं. मग आले कशाला परत! कोणाचा खोळंबा झाला होता इथं!

**जीजी :** *(चकित होऊन)* भावोजींबद्दल का हे शब्द ? छान ! चांगलं ! घरीं परतल्यापासून त्यांनीं आपल्यासाठीं इतकं हें केलं, आणि——

**दादा :** *(कडाडून)* इतकं केलं त्याचीच लाचारी आली आहे तुम्हां सर्वांना, समजलांत ? घरच्या माणसांना सोडून बाहेरच्यांचे देव्हारे माजवायला लागलां आहांत तुम्ही.

**जीजी :** भावोजी बाहेरचे का ? मग गाडींत भेटलेल्या कोठल्या कोण खुळ्या भिकाऱ्यासाठीं कशाला एवढा जीव टाकणं चाललं होतं ?

**दादा :** त्याच्याबद्दल एक शब्द बोलूं नका. *(कातर स्वरांत)* तुमच्या छळामुळंच बिचाऱ्यानं तोंड दाखवलं नाहीं पुन्हा. खुळा असला तरी भाबडा होता बिचारा. मायेनं पोटाशीं घेतलं तर कधीं हुरळला नाहीं, किंवा छडीनं चोपलं तर कधीं उलट भाषा केली नाहीं. पैशाची अशी मस्ती नव्हती आली त्याला.

**जीजी :** भावोजींना पैशाची मस्ती आलीय ?

**दादा :** मस्ती नाहीं तर काय ? बापूला आम्हीं घरांतून घालवून दिला तर यानं पैशाच्या जोरावर त्याला पाठीशीं घातला. काय राहिला आमचा मान ? दोन दिवस उपाशी पोटीं रस्त्यावर तडफडूं द्यायचा होता, कीं आपसूक लोटांगण घालीत आला असता आमच्या पायाशीं.

**जीजी :** झालं गेलं होऊन गेलं. त्याचा डूख जन्मभर का धरून बसायचं ? भावोजींनीं केलं त्यांत कोणाचं अकल्याण तर नाहीं ना झालं ?

**दादा :** तो शहाणपणा आम्हांला तुमच्याकडून शिकायची गरज नाहीं. म्हटलं, म्हणून आम्ही खरोखरीच का त्याला उपाशी मारणार होतों ? अरे, आम्हांला काय राक्षस समजलांत कीं काय तुम्ही ? त्याला क्षमा करायची, दया दाखवायची ती प्रसंग आल्यावर आम्हीं दाखवली नसती का ? पण त्यापूर्वीच या चांडाळानं त्याला फितवला. पोरांच्या हिशेबीं तो ठरला संत-सज्जन, आणि आम्ही... आम्ही...*(विव्हल होत)* उरलों निर्दय क्रूर राक्षस.

**जीजी :** यांच्याशीं बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं. *(रागानें निघून जातात.)* *(तेवढ्यांत पांढरा प्रकाश ओसरतो आणि निळ्या प्रकाशानें रंगभूमि उजळते. पार्श्वसंगीत सुरू होतें. बांसरीचे स्वर ऐकूं येऊं लागतात. दादासाहेब मात्र*

*कावरेबावरे होऊन सर्वत्र शोध घेऊं लागतात. मग बांसरी थांबते. हलके हलके 'गरिबाला पैसा दे भगवान' हें रांगडें गाणें ऐकूं येऊं लागतें. त्यामुळें ते अधिकच अस्वस्थ होतात. अखेर तें गाणेंहि थांबतें. आणि मग "...दादा, मला मारूं नका...मला मारूं नका हो मारूं नका...वाटल्यास घर सोडतों, पण मारूं नका..." असा रडत फोडलेला हंबरडा त्यांना ऐकूं येतो. त्यामुळें तर दादासाहेब अगदीं कळवळून जातात. "दाम्या...दाम्या...तूं कुठं आहेस? अरे तूं आहेस कुठं? कोठून ओरडतो आहेस? कोण कोण मारतंय् तुला? दाम्या... दाम्या..." असें दादासाहेब म्हणूं लागतात. मग दाम्याचा तो हंबरडादेखील थांबतो. पण दादासाहेबाना दामू मात्र कोठेहि दिसत नाहीं.)*

**दादा :** *(अधीर विव्हलतेनें)* दाम्या, तूं आहेस तरी कुठं? वेड्या, कुठं कुठं शोध घ्यायचा तुझा? अरे, तूं दिवसचे दिवस असा जाऊन बसतोस तरी कुठं? दाम्या, तुला कोणी थारा तरी देतो का आपल्या घरांत? दाम्या, तुझं घर कुठं आहे? उन्हांत? उन्हांत? काय वेडा तर नाहींस? वेड्या, उन्हांत का कोणी घर करतं? तूं खुळा झालास म्हणून आम्ही तुझं उन्हांत का घर बांधूं? वेडा रे वेडा! ये, ये आतां. नको आतां आमचा असा अंत बघूं. तुला शोधायलासुद्धां आतां आमच्या अंगीं त्राण उरलं नाहीं. ये रे! तुझ्यापुढें आम्ही पदर पसरतों. भीक मागतों. पण दाम्या, तूं एकदां तरी ये. तुला हें घर नको असलं तर आपण दोघे मिळून तुझ्या घरीं जाऊं. खरंच...खरंच सांगतों आम्ही. चल बाबा, या घरांत आतां आमची कोणाला गरज उरली नाहीं. कोणाला नाहीं तरी, दाम्या, तुला आमची अजून जरुरी आहे. प्रायश्चित्त म्हणून तरी दाम्या कुबडीसारखा तुझ्या पंगू आयुष्यांत आमचा उपयोग झाला तर आतां आमचे उरलेले चार दिवस तरी समाधानांत जातील. दाम्या...

*(एकदम् पार्श्वसंगीत थांबतें. पांढऱ्या प्रकाशानें रंगभूमी उजळते तोंच मोटारचा हॉर्न ऐकूं येतो.)*

**जीजी :** *(लगबगीनें प्रवेशत)* अगबाई! मंडळी आली वाटतं समारंभाहून परत. *(जीजी घाईनें बाहेर जातात. दादासाहेब दिङ्मूढ होऊन कपाळाला हात लावीत पुटपुटत आंत जातात. तेवढ्यांत बाहेर हसण्याबोलण्याचा गलबला ऐकूं येतो. बोलतच अत्यानंदांत चंदू, शकू, पंत आणि जीजी*

*प्रवेशतात. चंदू नखशिखांत साहेबी पोशाखाच्या थाटांत आहे. त्याच्या हातांत करकरीत पोर्टमँटो आहे. त्यावरून हा कोणी बडा अमलदार असावा असा नवख्याचा सहजच तर्क व्हावा. पण वृत्ति पूर्वीचीच. शकूहि नटून थटून परतली आहे. इतकंच काय पण पंतांची सूरतदेखील बदलली आहे.)*

**शकू :** जीजी, किती छान झाला समारंभ. मंडप नुसता फुलून गेला होता माणसांनीं. दादा नाहीं तर तूं तरी यायला हवं होतंस.

**चंदू :** ग्रँड! सिम्प्ली वंडरफुल! यू मिस्ड् ए ग्रेट इव्हेंट जीजी.

**जीजी :** काय बोलायचं तें चांगलं नीट मराठींत बोल बाबा.

**शकू :** नाहीं तर काय जीजी, याला वाटायला लागलंय कीं आपणच ब्रह्मदेशांत जाऊन संपत्ति मिळवून आणलीय.

**चंदू :** नाहीं पण असं फंक्शनच झालं नाहीं कधीं या गांवांत.

**पंत :** कृष्णाबाईच्या उत्सवाची आठवण झाली बघा वहिनीसाहेब.

**चंदू :** कृष्णाबाईचा उत्सव? काय समजलांत काय पंत तुम्ही? भंडाऱ्याच्या जेवणावळीसाठीं जमलेली ती काय भटाभिक्षुकांची गर्दी होती होय? वा, खूप आहांत कीं? अहो, नुसत्या पांच-पन्नास लँडो कार्स उभ्या होत्या करकरीत. छकड्याच्या पलीकडं पाहिल्या आहेत कधीं कसल्या गाड्या?

**शकू :** तुझा जन्म जसा कांहीं उशापायथ्याशीं गाड्या ठेवण्यांतच गेला आहे कीं नाहीं?

**चंदू :** रावजी, *(रावजी येतो.)* हा पोर्टमँटो माझ्या ऑफिसमध्यें नेऊन ठेव आणि दुपारची डाक आली असली तर घेऊन ये. *(रावजी बॅग घेऊन जातो.)*

**जीजी :** पार्टी कशी काय झाली?

**चंदू :** वा! कशी म्हणून काय विचारतेस? मीं कारभार बघायला असतांना कोठली गोष्ट कधीं बिघडली आहे का?

**पंत :** मला वाटतं पांचशेंवर तरी पान झालं असेल.

**चंदू :** पान? अरे, काय बोलताहांत काय पंत? पान? आतां पेशवाईचा कारभार उरला नाहीं पंत?

**पंत** : *(ओशाळून)* तेंच, म्हणजे तुमच्या त्या चिनी मातीच्या बशा म्हणायचं होतं मला.

**शकू** : तूं नुसतं खादीचं बघत जा बघ. केक्स खाण्याचा असा सपाटा चालवला होता यानं म्हणतेस जीजी—

**चंदू** : म्हणजे कमाल झाली बोवा! उचललेली प्रत्येक बशी मी काय माझ्या पोटात रिचवत होतों? पाहुण्यांना नेऊन दिल्या मीं त्या बशा बरं का बाईसाहेब?

**जीजी** : तेवढं काम मात्र इमानानं केलं असशील अगदीं.

**शकू** : काका किती छान बोलतात जीजी!

**जीजी** : म्हणजे भावोजींचंसुद्धां भाषण झालं का?

**चंदू** : अग काकांचं काय, माझं सुद्धां भाषण झालं.

**शकू** : तुझं पुरे झालं! आभाराचे चार शब्द बोलतांना फेफे उडाली. काय तर म्हणे—"बंधुभगिनी महाराज अध्यक्षांनो..."

**चंदू** : भाषण करणं हा सरावाचा प्रश्न आहे. काका किती झालं तरी जग हिंडून आले आहेत. त्यांची माझी कशी बरोबरी होईल?

**पंत** : सभा चित्रासारखी तटस्थ होती दामूरावांचं भाषण ऐकतांना.

**चंदू** : काकांचे ब्रह्मदेशांतील अनुभवच मुळीं थ्रिलिंग होते. माणूस असावा तर असा! नाहीं तर आहेत आमचे आपले *(ओठावर मिशांचे आंकडे दाखवून हंसतो.)* हे!

**जीजी** : चंदू, चंद्या—

**चंदू** : घरांत नाहींत ना दादा?

**शकू** : घरांत असले तरी तूं थोडाच दाद देतो आहेस त्यांना?

**चंदू** : त्यांचं तें 'गरिबाला पैसा दे भगवान' कोठवर आलंय?

**जीजी** : आलंय तुझ्या गळ्यापर्यंत, समजलास?

**शकू** : आणि बरं का जीजी, काकांच्या कारखान्यांत केवढालीं मोठीं यंत्रं बसवलीं आहेत म्हणतेस?

**चंदू** : केवढालीं यंत्रं म्हणजे? साखरेचा कारखाना म्हणजे तुला काय दादू

तांबटाची पिठाची गिरणी वाटली होय ? तरी ज्यूडास कंपनीचा बॉयलर बसला नाहीं अजून. तो बॉयलर पाहिलात म्हणजे डोळेच फिरतील तुम्हां लोकांचे.

**जीजी** : बॉयलर म्हणजे काय बाई ?

**चंदू** : बॉयलर माहीत नाहीं अजून तुम्हां मंडळींना ? कमाल झाली ! बॉयलर ? दॅट व्हिच बॉइल्स ? फारच भयंकर आहे प्रकरण तें. चार हत्तींना आवरत नाहीं तें.

**शकू** : मग तसलं यंत्र का तूं चालवणार आहेस ?

**चंदू** : अॅ हॅं हॅं ! मी मॅनेजर आहें कारखान्याचा, फिटर नाहीं.

**जीजी** : भावोजी कसे आले नाहींत अजून ?

**शकू** : अग, काकांचं काय विचारतेस ? त्याच्याभोंवतीं बड्या बड्या मंडळींचा गराडा पडला होता. तेव्हां आम्हीं म्हटलं कीं आपण पुढं व्हावं आणि त्यांना गाडी परत पाठवून द्यावी.

**जीजी** : आणि बापूचं काय झालं ?

**चंदू** : बापू आला होता कीं. पण इकडं समारंभ चालला असतांनादेखील त्याचे आपले हातवारे आणि ताना चालल्या होत्या. सबंध कार्यक्रमांत त्यानं स्वागतपर पद्य, ईशस्तवन आणि वंदेमातरम् तेवढं काय तें मन लावून ऐकलं.

**जीजी** : बापूची बायको आली होती का ?

**शकू** : ऊंहूं. वहिनी कांहीं आली नाहीं.

**चंदू** : वहिनी ? काय काय म्हणालीस ? वहिनी ? अरे वा. "बया, आकाबाई, टवळी" असल्या शेलक्या विशेषणांनीं कालपरवापर्यंत जिची शोभा चालली होती ती आज एकदम 'वहिनी' झाली का ? शाबास !

**शकू** : मागं कांहीं झालं असलं तरी बापूनं लग्न केलंय ना आतां तिच्याशीं ? मग नको म्हणायला वहिनी ?

**चंदू** : नुसतं लग्न केलंय म्हणून नव्हे बरं का बाईसाहेब ?

**शकू** : *(वेडावून)* मग आणखी काय हो बुवासाहेब ?

**चंदू** : दामोदरकाकांनीं त्या दोघांना घर थाटून दिलंय म्हणून—

**जीजी** : बरं बरं, समजली आपली अक्कल.

**चंदू :** मीं आपली गंमत बघतोंय. काकांना गाण्याची आवड आहे हें समजल्या-पासून आपले पंतसुद्धां ख्याल आणि ठुमरी गुणगुणायला लागले आहेत या घरांत आतांशीं !

**पंत :** *(लाजत)* छे छे चंदूराव, भलतंच काय...म्हणजे आपलं...

**चंदू :** खरं बोला, खरं बोला पंत, आंघोळ करतांना गात असतां कीं नाहीं अलीकडं तुम्ही ?

**पंत :** नाहीं म्हणजे...मारुती स्तोत्र म्हणतो कधींमधीं मी...पण—

**चंदू :** स्तोत्र ? मारुती स्तोत्र ? मारुती स्तोत्र ? अरे, जरा खरं बोललांत तर कोणी फाशीं नाहीं देणार पंत या वाड्यावर तुम्हांला. आतां जमाना बदललाय.

**पंत :** *(लाजत)* नाहीं पण...होय म्हणजे स्तोत्रच—

**चंदू :** नाहीं पण काय ? 'सैंया जा जा मोसे न बोलो' हें तुमचं स्तोत्र काय ? 'ऐसी ना मारो पिचकारी' हें देखील मारुतीचं स्तोत्र वाटतं ?

**शकू :** बरं म्हणत असतील. मग ? तुझ्या कां रे पोटांत दुखायला लागलंय् ?

**चंदू :** तसं नव्हे, पण मी आपला विचार करतोंय की काकांना जर ब्रिज किंवा रमी खेळायचा नाद असता तर—

**शकू :** तर काय झालं असतं ? तुझ्यासारखा त्या टोलनाक्यावरच्या टोळभैरवांना घरांत घेऊन रात्रंदिवस त्यांनीं पत्त्याचा अड्डा मांडला असता होय ?

**जीजी :** त्याच्या काय नादीं लागतेस ग तूं ? बापूची बायको कां आली नाहीं समारंभाला ?

**चंदू :** ती म्हणाली म्हणे, म्हणजे बापूराव म्हणाले हो असं, कीं तिथं दादा येणार असले तर मी कांहीं येणार नाहीं.

**जीजी :** *(सुस्कारून)* केव्हां हें प्रकरण संपायचं आहे ईश्वर जाणे !

**शकू :** दादा आले नाहींत ही गोष्ट काकांच्या मनाला फार लागली.

**जीजी :** त्याला कोणाचा कांहीं इलाज आहे का ? माणसानं कोणती गोष्ट समजुतीनं घ्यायचीच नाहीं असं एकदां ठरवलं, तर—

**चंदू :** नाहीं तर नाहीं ! अलीकडं दादासाहेबांचं फारच स्तोम माजलंय् आपल्या

घरांत. मी म्हणतों कीं दादासाहेब आले नाहींत तें एकपरीनं बरंच झालं. तिथं म्हणजे माणसांची कोण गर्दी! अगदीं ठेचाठेच. गर्दी आवरतां आवरतां आमच्या तोंडाला फेस यायची पाळी आली होती. यांची मिजास कोण सांभाळणार तिथं? कोणावर तरी गुरगुरले असते आणि कोणावर तरी कावले असते. बड्या माणसांच्यांत वावरायचा त्यांना सराव तरी आहे का? बावड्याचे सावकार म्हणजे त्यांची मोठेपणाची अगदीं हद्द झाली. *(तेवढ्यांत मोटारचा हॉर्न ऐकूं येतो. त्याबरोबर सर्वांचीच, विशेषतः चंदूची तारांबळ उडते.)*

**जीजी** : पुरे झाल्या तुमच्या गप्पा. भावजी आले वाटतं.

**चंदू** : जीजी, काकांचा फराळ व्हायचा आहे बरं का? शकू, तूं दूध घेऊन ये पाहूं काकांच्यासाठीं?

**शकू** : अरे, पण काकांना घरांत तरी येऊं देशील कीं नाहीं?

**चंदू** : पंत, ऑफिसमध्यें जाऊन दुपारची डाक बघा पाहूं एकदां? हा रावजी गद्धा कुठं उंडारतो आहे अजून देव जाणें! *(गडबडीनें जातो.)*

*(जीजी कोचावरील अभ्रे नीट करूं लागतात. पंत जातां जातां हलकेच मागें वळून कानोसा घेत—)*

**पंत** : रावसाहेबांची नवी योजना ऐकली कीं नाहीं आपण अजून?

**जीजी** : *(थबकून, विस्मयानें)* यांची? नवी योजना? नाहीं बाई!

**पंत** : शकूताईच्या लग्नाबद्दल कांहीं बोलले नाहींत रावसाहेब तुम्हाला?

**जीजी** : शकूचं लग्न? नवीनच ऐकतें मी हें. काय भानगड आहे ही?

**पंत** : *(हसून)* छा छा! सगळीच मौज आहे झालं.

**जीजी** : म्हणजे मी नाहीं समजलें!

*(तेवढ्यांत जांत यणाऱ्या माणसांच्या हसण्याबोलण्याचा आवाज येतो)*

**पंत** : सांगतों काय—

*(जीजी विस्मयानें पंतांच्याकडे बघूं लागतात, तोंच दामोदरपंत, बापू आणि चंदू प्रवेशतात. त्यांना पाहतांच पंत लगबगीनें जातात. दामोदरपंतांच्या चेहऱ्याची ठेवण थेट खुळ्या दामूसारखीच. पण पोशाख, चालचलणूक आणि बोलणें यांत मात्र जमीनअस्मानाचें अंतर. दामोदरपंत अत्यंत रुबाबदार*

*दिसतात. त्यांचा शांत स्वभाव, लाघवी प्रेमळ बोलणें आणि कामकाज उरकण्यांतली त्यांची धमक आणि चमक, तसेंच सर्वांवर प्रेमळ वचक ठेवण्यांतील त्यांची चतुराई, यांचा ठसा त्यांना पाहतांच मनावर ठसावा. बापूची मुद्रा नाराज दिसते आहे. त्याची समजूत घालीतच दामोदरपंतांनीं त्याला घरांत आणलें आहे हें उघड आहे.)*

**दामोदरपंत :** *(बापू दारांतच थबकलेला बघून)* ये, ये ना! आंतमधें तर येशील कीं नाहीं?

**बापू :** या घरांत पाऊल टाकायला मला तुम्ही आग्रह करूं नका काका. तुमचा शब्द मला मोडवणार नाहीं. पण दादांनीं मला याच घरांतून घालवून दिलंय् हें तुम्ही विसरलांत का?

**दामोदरपंत :** मोठ्या माणसांच्या मायेच्या गोष्टी तेवढ्या मी लक्षांत ठेवतों. दादांनीं तुला घालवून दिलं असलं तर आतां मी त्यांचा धाकटा भाऊ म्हणून तुला त्यांच्या वतीनं घरांत परत बोलावतों आहें.

**बापू :** पण काका—

**दामोदरपंत :** तूं असा दारांत उभा राहून बोलणार असलास तर मी तुझं कांहीं एक ऐकणार नाहीं. चल, अगोदर घरांत ये बघूं!

*(या प्रेमळ हुकुमापुढें बापूचा नाइलाज होतो आणि तो आंत प्रवेशतो.)*

**बापू :** पण काका दादांनीं मला आजपर्यंत किती वाईट वागवलंय त्याची तुम्हांला कल्पना—

**दामोदरपंत :** *(हसून)* माझ्याइतकं तर वाईट नाहीं ना वागवलं? मग मी मुद्धां जें विसरलों तें तुला विसरतां येऊं नये? अरे, वडील माणसांच्या चुका आपण मोठ्या मनानं पोटांत घालायला नकोत का? आतां आजचंच पाहा. मी दहा वेळां बोलावणं करून देखील दादा आणि वहिनी कांहीं आजच्या समारंभाला आलीं नाहींत. आपल्या माणसांनींच या समारंभाकडं पाठ फिरवली तर मीं कोणाकडं दाद मागायची?

**जीजी :** *(हसून)* कळला हं भावोजी तुमचा टोमणा. पण मी कां आलें नाहीं त्याचं कारण सांगितलं होतं मीं तुम्हांला.

**दामोदरपंत :** टोमणा नव्हे हा वहिनी. अशा अर्थानं तुम्हीं माझं बोलणं घेऊं नका. पण आपल्याला न रुचणाऱ्या गोष्टी देखील कशा पचवाव्या लागतात तें मी बापूला सांगतोंय. अरे, दादा तुला बोलले तेवढंच तूं लक्षांत घेऊन बसलास, पण तुमच्यासाठीं त्यांनीं आजवर ज्या खस्ता खाल्ल्या त्या तूं विसरलास का ? *(क्षणभर थांबून, बापूकडे रोखून बघत, त्याच्या खांद्यावर हात ठेवीत प्रेमळपणें)* मीं काय सांगितलं त्याचा नीट विचार कर. मला आपलं वाटतं, की या एका गांवांत आपलीं दोन वेगळीं घरं असणं बरं नाहीं. *(शकू दुधाचा पेला घेऊन येते. हसून तिच्या हातून पेला घेत)* वा, शकूताई, बऱ्याच तत्परतेनें सेवा करता येते म्हणायची तुम्हांला ?

**चंदू :** तिची नव्हे, माझी तत्परता आहे ती.

**शकू :** तेवढंसुद्धां श्रेय देऊं नकोस तूं मला. कारखान्यापेक्षां हॉटेलचा मॅनेजर चांगला शोभशील बघ तूं.

**चंदू :** काकांनीं हॉटेल काढलं तर मॅनेजरच काय पण बटलर देखील व्हायची माझी तयारी आहे. तुझ्यासारखा चांगला पोशाखांतला मी नुसता मिरव्या नाहीं, बरं का ?

**दामोदरपंत :** बाकी शकूताई, तुमचा थाटमाट आज अगदीं बघण्यासारखा होता बोवा. बरींच माणसं आपलीं आडून आडून चौकशी करीत होतीं तुमची. काय वहिनी, लग्न करायचं का यंदा शकूचं ? बोला !

**शकू :** *(लाजून)* इश्श ! हें हो काय काका तुमचं ?

**जीजी :** तिनं आधींच पाहून ठेवलाय आपला नवरा.

**दामोदरपंत :** आं ? अरेच्या ? हें नव्हतं आम्हाला ठाऊक. कोण काढला आहेस ग नवरा शोधून ? आम्हांला कळूं दे तरी ?

**शकू :** जीजी सांगते आणि तुम्ही ऐका.

**जीजी :** *(हसून)* मी सांगूं का ? बावड्याचे—

**शकू :** जीजी, जीजी बघ हं ! थट्टेला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं ? त्या मेल्याचं पुन्हा नांव काढलंस तर बघ हं.

**चंदू :** ॲहं ! नाहींतर काय जन्मभर बेगम राहणार आहेस वाटतं ?

**जीजी :** तिच्या आधीं तूं आपला विचार कर? नटला आहेस तर एखाद्या नवरदेवासारखा.

**दामोदरपंत :** बरं का चंदू, कारखान्यांत काम करायचं म्हणजे असला पोशाखीपणा उपयोगी नाहीं हो! वेळप्रसंगीं अस्तन्या वर सारून यंत्राशीं हुज्जत घालायची तयारी पाहिजे.

**चंदू :** माझा बॉयलरसूट केव्हांच तयार ठेवलाय मी त्यासाठीं. हा माझा ऑफिस ड्रेस आहे.

**दामोदरपंत :** असं का? अरे वा! म्हणजे यंत्रं बंद पडल्यावर प्रथम तूं बॉयलरसूट घालणार तर? मग ऑफिसरसाहेब, आज ऑफिसमधलीं तरी काय काय कामं झालीं तें तरी कळूं द्या आम्हांला? या असे, बसा इथं.

**चंदू :** *(ऐटींत बसत)* ऑल क्लिअर! एकहि काम बाकी नाहीं.

**दामोदरपंत :** दुपारची डाक पाहिलीस?

**चंदू :** रामशरणला सांगितलं होतं डाक घेऊन यायला. पंतहि तिकडेच गेलेत. कोणावर कामं सोपवायची कांहीं सोय उरली नाहीं.

**दामोदरपंत :** दुसऱ्यावर सोपवायचीं नाहींत हीं कामं? स्वतः जाऊन राबायला पाहिजे ऑफिसमधें. बरं, काल सांगितलेलीं पत्रं तयार झालीं?

**चंदू :** *(गडबडून)* हो, म्हणजे झालींच म्हणायचीं. टाइप होऊन फक्त—

**दामोदरपंत :** म्हणजे झालीं नाहींत. बरं ज्यूडास अँड को ला टेलिग्रॅम तरी गेला का?

**चंदू :** तारेचा फॉर्मच नव्हता ऑफिसमध्यें.

**दामोदरपंत :** म्हणजे तेंहि काम झालं नाहीं. इंटरव्ह्यूसाठीं माणसं येणार होतीं संध्याकाळीं?

**चंदू :** आतां निघालोंच आहें मी तिकडं——

**दामोदरपंत :** *(हसून)* चंदूराव, कसं निभायचं हें काम?

**चंदू :** *(ओशाळून)* नाहीं काका, आत्तां जाऊन करतों सगळीं कामं.

**शकू :** *(वेडावून)* ऑल क्लिअर. फक्त एकहि काम झालेलं नाहीं.

**चंदू :** शके—

*(चंदू मारण्याचा आविर्भाव करीत तिच्या अंगावर धावून जातो पण मग दुधाचा रिकामा कप उचलून शकू वेडावून आंत पळून जाते. मग चंदू दुसऱ्या दारानें बाहेर पडतो.)*

**जीजी :** पोरगा इतक्या लवकर सरळ येईल असं वाटलं नव्हतं. तुमचे उपकार आहेत भावोजी आमच्यावर.

**दामोदरपंत :** घरांतल्या माणसांचे उपकार कसले मानतां वहिनी ?

**जीजी :** तुमच्यामुळं सुधारला हा चंदू, नाहींतर त्याच्या वांडपणाला यांनादेखील आवर घालतां आला नाहीं कधीं.

**दामोदरपंत :** माणसं वागविण्याची एक एक पद्धत असते वहिनी. नुसती हडेलहप्पी केल्यानं का तरुणांचीं मनं ताळ्यावर येतील ?

**जीजी :** यांना शिकवा एकदां हें.

**दामोदरपंत :** असल्या गोष्टी शिकवून का येतात ? स्वभावदोष म्हणून सोडून द्यायला पाहिजे आपण.

**जीजी :** असला कसला घरादाराचं वाटोळं करणारा स्वभावदोष ?

**दामोदरपंत :** खरं सांगूं वहिनी ? दादांना मी जितकं ओळखलंय् तितकं तुम्हीं कोणींच ओळखलेलं नाहीं. ते रागीट असूं देत. पण त्यांचं अंतःकरण तितकंच कमालीचं कोमल आहे. खरं कीं नाहीं बापू ?

**बापू :** *(इतकावेळ याची गायनसमाधि लागली होती. हातवारे करतां करतां मधेंच भानावर येऊन बावचळल्यासारखी मुद्रा करीत—)*आं ? काय म्हणालांत कोमल ? कोमल निषाध कीं कोमल गंधार ? मला वाटतं कोमल निषाधच असावा. पण विचारायला हवं एकदा खांसाहेबांना. *(दामोदरपंत आणि जीजी हसतात.)*

**दामोदरपंत :** अवलिया आहेस खरा.

**बापू :** *(गोंधळून)* कां ? काय झालं ?

**दामोदरपंत :** कांहीं झालं नाहीं. तुला वाटलं तेंच बरोबर आहे. कोमल निषाधच, बरं का ?

**जीजी :** तुम्हीं घर सोडलंत तो दिवस आठवला कीं अजून माझ्या अंगावर कांटा उभा राहतो.

**दामोदरपंत :** मी तो दिवस केव्हांच विसरलों. माझ्या लक्षांत आहेत ते दादांच्या मायेचे प्रसंग. वहिनी, तुम्हांला कल्पना नाहीं, पण दादांनींच माझ्या-सारख्या पोरक्या पोराला या खानदानी वाड्यावर आपल्या पंखाखालीं घेऊन वाढवलं. कोणाच्याहि विरोधाला न जुमानतां प्रत्येक वेळीं ते माझ्यामागं डोंगरासारखे उभे होते. मी तर म्हणतों कीं मला त्या वेळीं मार देऊन माझ्यावर उपकारच केला दादांनीं!

**जीजी :** उपकार? कांहींतरीच तुमचं बोलणं.

**दामोदरपंत :** उपकारच नाहीं का? त्यामुळं तर मी एवढं जग बघूं शकलों; मनगटाच्या जोरावर पैसा मिळवूं शकलों.

**जीजी :** *(हंसून)* मग त्या उपकाराची ही अशी फेड करून आम्हांला लाजवायला घरीं परत यायचा बेत केला वाटतं तुम्हीं?

**दामोदरपंत :** चुकीची कल्पना आहे वहिनी तुमची. मी घरीं परत आलों तो केवळ दादांच्यासाठीं.

**जीजी :** यांच्यासाठीं?

**दामोदरपंत :** होय. दादांच्यासाठीं. दादांचा मला किती लळा होता तें तुम्हांला समजणं शक्य नाहीं. मी पंगतीला नसलों तर त्यांना घास घशाखालीं उतरायचा नाहीं. दादा कधीं त्यावेळीं परगांवीं गेले तर दिवस दिवस मी बेचैन होत होतों. म्हणून—

*(तेवढ्यांत चंदू हातात एक पत्र घेऊन प्रवेशतो.)*

**चंदू :** बावड्याहून बाबा महाराजांचं पत्र आलंय पुन्हा आज.

**दामोदरपंत :** फक्त एकच पत्र?

**चंदू :** नाहीं पत्र पुष्कळ आहेत, पण या पत्राला उतर काय घालायचं तें विचारायला आलोंय मी. *(दामोदरपंत पत्र हातांत घेऊन वाचतात आणि परत देत—)*

**दामोदरपंत :** त्यांना कळव कीं नुसतीं पत्रं लिहून असा तगादा लावण्यांत

कांहीं अर्थ नाहीं. व्याजमुद्दलाचा सगळाच हिशेब घेऊन तुम्ही जातीनं इथं या, आमची खात्री पटवा, आणि एका रकमेनं चेक घेऊन जा.

**चंदू :** ठीक आहे. *(जाऊं लागतो.)*

**दामोदरपंत :** आणि हें बघ, त्यांना एकदां स्पष्ट कळवून टाक कीं सगळ्या जमिनी आम्ही सोडवणार आहोत. तेव्हां पुन्हा खरेदीची भाषा करूं नका म्हणावं.

**चंदू :** ठीक आहे. *(जाऊं लागतो. पुन्हा परत येत)* पत्रावर सही तुमचीच टाकायची ना काका ?

**दामोदरपंत :** ऊं हूं ! दादांची.

**चंदू :** पण मला वाटतं---

**दामोदरपंत :** तुला कांहीं वाटायची गरज नाहीं. मीं सांगितलं तसंच करायचं. पत्रावर दादांचीच सही घ्यायची. हूं ! मग काय बापूराव, ठरलं तर ? ऊं ? *(चंदू घोटाळत मागें तसाच उभा राहतो.)*

**बापू :** *(दचकून)* काय ठरलं ?

**दामोदरपंत :** उद्यां बिऱ्हाड आवरून तूं आणि तुझ्या बायकोनं इथं राहायला यायचं *(बापू गंभीरपणानं गप्प राहतो.)* बघ बोवा. तूं येणार नसलास तर आम्हीच सगळे उठून तुझ्याकडे राहायला येऊं. काय वहिनी ?

**जीजी :** त्यानं ऐकलं नाहीं तर असंच करायचं. पण तुला इतकं अवघड वाटण्यासारखं आतां कांहीं उरलंय का ?

**बापू :** दादांची परवानगी आहे का तुमच्या बेताला ?

**जीजी :** यांच्या परवानगीची गरजच काय मुळीं ? भावोजींनीं तुला सांगितलंय तें काय---

**दामोदरपंत :** तेवढीच अडचण असेल तर मी सांगेन दादांना काय सांगायचं तें.

**बापू :** तेवढीच अडचण आहे असं नव्हे. पण...*(घुटमळतो.)*

**दामोदरपंत :** मग दुसरी कोणती अडचण ?

**बापू :** अडचण माझ्याबद्दल नाहीं मला वाटत. पण...*(घुटमळतो)*

**दामोदरपंत :** मग अडचण आहे कोणाची ?

**बापू :** तसं नव्हे पण—

**दामोदरपंत :** *(हसून)* पण बायको काय म्हणेल?—असंच ना? हत् लेका. बायकोला तूं घाबरतोस? इतका घाबरतोस? अरे ठाकुरांच्या घराण्यांतील पुरुष म्हणजे कसा पाहिजे—अगदीं—

**चंदू :** *(मधेंच तोंड खुपसत)* नारसिंहासारखा.

**दामोदरपंत :** *(वळून आश्चर्यानें)* ऊं? कोण चंदू? तूं अजून इथंच!

**चंदू :** *(जाऊ लागत)* नाहीं—निघालोंच काका—

**दामोदरपंत :** आधीं इकडं ये. असा पळूं नकोस आतां—ये इकडं. *(चंदू येतो.)* हं काय म्हणत होतास तूं? कसा पाहिजे ठाकुरांच्या घरांतील पुरुष?

**चंदू :** *(वरमून)* नाहीं म्हणजे...कमींत कमी साध्या सिंहासारखा तरी हवाच.

**दामोदरपंत :** मग? हा बापू तुला काय असा तसा वाटला होय? अरे, हा सिंह एकदा खवळला तर—

**चंदू :** कोण? हा सिंह? हा बापू सिंह? अं! एकाद्या सर्कशींतला सिंह देखील बरा याच्यापुढं—

**बापू :** चंदू—

**चंदू :** नाहीं पण काका, लग्न झाल्यापासून बापूची अगदी भेंड्याची भाजी झालीय—

**बापू :** किती वाह्यातपणा करशील रे?

**चंदू :** मी वाह्यात? मी वाह्यात? मग काय हो वनराज? परवा संध्याकाळीं मी आपल्या घरीं समारंभाचं निमंत्रण करायला आलों होतों त्यावेळीं—

**बापू :** *(आरडून)* चंदू—चंद्या—आतां गप्प बसशील कीं नाहीं?

**दामोदरपंत :** *(मिष्किलपणें)* ही 'भेंड्याची भाजी' काय प्रकरण आहे बोवा? समजलंच पाहिजे आम्हांला.

**बापू :** कांहीं नाहीं हो काका—हा हा कांहींतरीच सांगतोय.

**चंदू :** बरं राहिलं.

**दामोदरपंत :** नाहीं नाहीं, काय झालं तें समजलंच पाहिजे आम्हांला. सांग, सांग रे तूं चंदू—

**चंदू :** म्हणजे झालं काय काका—समारंभाचं निमंत्रण करायला मी परवा संध्याकाळीं बापूच्या घरीं गेलों होतों ना, त्यावेळीं सौ. बापूराव तंबोऱ्यावर गोड आवाजांत दरबारी कानडा गात बसल्या होत्या आणि हा हा तुमचा सिंह स्वयंपाकघरांत—

**बापू :** चंदू—चंदू—बघ हं—

**दामोदरपंत :** हा हा काय करीत होता ? तबल्यावर ताल धरीत होता ?

**बापू :** नाहीं हो काका—कांहीं नाहीं, कांहीं नाहीं.

**चंदू :** तसं विशेष कांहीं नाहीं—पण हा सिंह स्वयंपाकघरांत पाटावरवंटा घेऊन चक्क चटणी वाटत होता. *(हसतो. सगळीं हसतात.)*

**बापू :** मग आपल्या घरांत काम करायची कसली हो लाज ?

**चंदू :** अरे पण चटणी ? पुरुषासारखा पुरुष असून चटणी वाटायची ?

**दामोदरपंत :** *(हसून)* बरोबर. चंदू म्हणतो तें अगदीं योग्य आहे. हा चंदू बघ—घरांतली तर जाऊं देच पण ऑफिसमधलींसुद्धां कामं करीत नाहीं. काय चंदू—

**चंदू :** *(एकदम वरमून)* नाहीं काका...म्हणजे...*(लगबगीनें पसार होतो.)*

**दामोदरपंत :** मग काय बापूराव ? ठरलं तर ? उद्यां तूं रोशनला घेऊन इथं येणार. ॲग्रीड ?

**बापू :** तुमच्यापुढं कोण काय बोलणार काका ? *(उठत)* बरं, जाऊं मी ?

**दामोदरपंत :** थांब ना ? वहिनी, दुपारच्या मेजवानींतला कांहीं प्रसाद उरला तर द्या ना बापूच्या बरोबर थोडा पाठवून ? आजच्या मेजवानीला हींच दोघं काय तीं नव्हतीं.

**बापू :** कसला प्रसाद ?

**जीजी :** तुला नि तुझ्या बायकोला थोडा खाऊ देतें तो घेऊन जा.

**बापू :** *(हसून)* बायकोला का ? रोशनला म्हण कीं ?

**जीजी** : *(फणकाऱ्यानं)* मी नाहीं घेणार तें तसलं नांव.

**दामोदरपंत** : बरं आपण तिचं नांव ठेऊं या रजनी. मग तर झालं? *(तेवढ्यांत पंत पत्र घेऊन प्रवेशतात.)* काय भानगड आणलीत आणखी पंत?

**पंत** : चंदूरावांनीं हें पत्र सहीसाठीं आपल्याकडं पाठवलंय.

**दामोदरपंत** : कोणतं पत्र? सावकारांना लिहिलेलं? आणि तें सहीसाठीं माझ्याकडं काय म्हणून ?

**पंत** : रावसाहेब पत्रावर सही करायला तयार नाहींत.

**दामोदरपंत** : सही करायला तयार नाहींत? तें कां?

**पंत** : चंदूरावांची आणि त्यांची कांहीं बोलाचाली झाली.

**जीजी** : हा गाढव बोलला असेल त्यांना कांहींतरी उलटून.

**दामोदरपंत** : छे छे. या पोरांना दुसऱ्याच्या पोटांत शिरून आपलीं कामं कशीं करून घ्यावीं तें कांहींच कळत नाहीं.

**जीजी** : आतां काय करणार?

**दामोदरपंत** : बघूं! काढूं कांहीं तरी उपाय. पण दादांनीं माझ्याशीं हें कसलं वैर मांडलं आहे त्याचा मला अजून कांहीं बोध होत नाहीं.

**जीजी** : वैर म्हणावं तर तसं वैरदेखील नाहीं.

**बापू** : तुम्ही येण्यापूर्वी तुमच्या नांवाचा नुसता धोसरा काढला होता.

**पंत** : अहो, तो खुळ्याचा भ्रम म्हणजे तर नुसती मौज होती मौज.

**जीजी** : मौज कसली आलीय? घरादाराचा छळवाद मांडला होता नुसता, दुसरं काय?

**दामोदरपंत** : पण मग सांपडला का तो खुळा?

**पंत** : छे छे, काय वेड? गांवगन्ना हिंडणारे असले खुळे शोधायचे म्हणजे पोलिसांची पलटणच सोडायला हवी त्यांच्या मागावर.

**दामोदरपंत** : माझ्यावर नाहीं तरी माझ्या नांवावर तरी दादांचं प्रेम आहे हें काय थोडं झालं?

**जीजी** : तसं का? तुमच्या मागं तुमच्या खाण्यापिण्याची, तुमच्या प्रकृतीची

चौकशी करून सतावून सोडतात हे आम्हांला. जसा कांहीं मीं सावत्रपणाच मांडला आहे घरामध्यें.

**दामोदरपंत :** *(विचारगंभीर होत)* असूं दे. राहूं दे हें पत्र. जें काय करायचं तें आतां मला स्वतःलाच केलं पाहिजे.

*(पंत जातात. दामोदरपंत विचारमग्न होतात. बापूराव स्वतःशींच गुणगुणूं लागतात. मग जीजी उठत म्हणतात—)*

**जीजी :** मी देतें तो डबा घरापर्यंत धडपणें पोंचणार आहे ना?

**बापू :** *(विस्मयानें)* पोंचणार आहे ना—म्हणजे?

**जीजी :** *(हसून)* नाहींतर घालशील एकाद्या खांसाहेबाच्या डोंबलावर!

**बापू :** काकांनीं दिलेला खाऊं? खांसाहेबांच्या डोंबलावर? काय समजतेस काय तूं मला जीजी?

**दामोदरपंत :** *(हसून)* ऊं हूं! काकांनीं दिलेला नव्हे बरं का बापूराव!

**बापू :** काकांनीं दिला नाहीं तर मग कोणीं?

**दामोदरपंत :** रजनीला सांगायचं कीं दादांनीं हा खाऊ पाठवलाय.

**बापू :** *(नाराजीनें ताडकन् उठत)* काय? काय म्हणालांत?

**दामोदरपंत :** *(शांतपणें)* रजनीला सांगायचं कीं दादांनीं हा तिच्यासाठीं खाऊ पाठवलाय. समजलं?

**बापू :** *(त्वेषानें)* काका, याचा अर्थ...

**दामोदर :** *(त्याला बोलूं न देतां)* तुम्ही डबा तयार करून द्या वहिनी.

*(जीजी क्षणार्ध आळीपाळीनें दोघांकडे बघतात आणि मग आंत जातात. क्षणभर दामोदरपंत आणि बापू परस्परांच्या नजरेंत रोखून बघतात. मग दामोदरपंत प्रसन्नपणें स्मित करतात. मग बापूहि हसतो.)*

**बापू :** *(हसत)* तुम्ही म्हणजे असे वस्ताद आहांत काका——

**दामोदरपंत :** तूंहि कांहि कमी वस्ताद नाहींस–

**बापू :** काय हो वस्तादपणा केला मीं?

**दामोदरपंत** : इतके दिवस तुझ्यामागं लागतोंय मी, पण एकदा तरी गाणं ऐकवलंस का तूं मला ?

**बापू** : केव्हां ऐकवणार ? तशी वेळ तरी जमून यायला नको का ?

**दामोदरपंत** : तसल्या सबबी नको सांगूं तूं मला. तुझी तब्येत असली, लहर लागली आणि मर्जी बसली तर या इथं, बसल्या जागीं, या क्षणाला देखील ऐकवशील तूं आपलं गाणं मला. म्हण कीं एकादी चीज ?

**बापू** : आत्तां ? या इथं ? या दिवाणखान्यांत गाणं ? छान ! काय विचार काय आहे काका तुमचा ? दादांनीं ऐकलं तर माझ्यासकट तुम्हाला देखील मारपीट करून हुसकावून लावतील ते वाड्यावरून, ठाऊक आहे ?

**दामोदरपंत** : कमाल आहे बोवा तुम्हां लोकांची. नुसतीं कल्पनेचींच भुतं नाचवीत आहांत तुम्ही तरूण मंडळी. अरे दादांना का मी ओळखत नाहीं का त्यांची गाण्याची आवड मला माहीत नाहीं ?

**बापू** : दादांना गाण्याची आवड ? नवीनच ऐकतों आहें मी हें ? तुम्ही दुसऱ्याच कोटल्या तरी दादांच्याबद्दल तर नाही ना बोलत ?

**दामोदरपंत** : तें मी आतां कधींतरी प्रत्यक्ष प्रयोग करूनच दाखवीन. तूं आम्हांला एकादी चीज ऐकवणार आहेस का आज तें सांग ?

**बापू** : तुमच्या प्रयोगाची जिम्मेदारी तुम्ही घेत असलांत तर गाणं काय मी केव्हांहि ऐकवीन. पण आमची एक अट आहे बरं का ?

**दामोदरपंत** : कोणती अट बोवा ?

**बापू** : तुमची इतिहासप्रसिद्ध बांसरी तुम्ही आम्हांला ऐकविली पाहिजे अगोदर ?

**दामोदरपंत** : बांसरी ? इतिहासप्रसिद्ध बांसरी ?

**बापू** : इतिहासप्रसिद्धच नाहीं का ? एवढा इतिहास ज्या बांसरीनं निर्माण केला ती बांसरी—

**दामोदरपंत** : *(विषण्णतेनें)* ती बांसरी आतां इतिहासजमा झाली. हें घर सोडल्यापासून पुन्हा म्हणून कांहीं मीं बांसरीला हात लावला नाहीं आजवर कधीं. आतां फक्त गाण्याची आवड तेवढी उरलीय.

**बापू :** *(कडवटपणें)* गाण्याची आवड ? या घराच्या वास्तूंत तुमची गाण्याची आवडदेखील लवकरच सुकून जाईल काका !

**दामोदरपंत :** *(विस्मयानें)* बडेभय्यांच्या घरांत गाण्याची आवड सुकून जाईल ? काय म्हणतोस काय तूं बापू ?

**बापू :** बडेभय्या ! केव्हांच संपले. *(हिटाळणीनें)* आतां या वास्तूंत उरली आहे फक्त दगडाची खाण ! तुमच्या कारखान्याला दगड हवेच आहेत, नाहीं का काका ?

**दामोदरपंत :** बापू—

**बापू :** *(स्वतःच्या कल्पनेवर मोठ्यानें हसून)* परंपरेच्या प्रवाहांत घासून घासून गुळगुळीत झालेल्या खानदानी दगडगोट्यांची खाण उघडली आहे खाण !

**दामोदरपंत :** *(बापूचें हसणें संपल्यावर गंभीरपणें)* तुझा जन्म याच खाणींतला ना ? मग तुझ्या गळ्याला हा गाण्याचा अंकुर कसा फुटला ?

**बापू :** *(अस्वस्थतेन उठून येरझारा घालीत)* निसर्गाचा चमत्कार आहे तो एक.

**दामोदरपंत :** चमत्कार ?

**बापू :** होय. आणि शाप देखील.

**दामोदरपंत :** शाप ?

**बापू :** *(वैतागानें)* हा शाप मला भोवला नसता तर त्यांच्या खानदानीच्या कोंदणांत मी देखील सुबकतेनं बसलों असतों. मग माझ्या कौतुकाला पारावार उरला नसता. निदान—त्यांच्या मायेला पारखं होण्याची तरी माझ्यावर पाळी आली नसती.

**दामोदरपंत :** *(उठून त्याच्या खांद्यावर हात ठेवून)* दादांना तुझ्याबद्दल माया वाटत नाहीं असं समजतोस का तूं

**बापू :** *(त्वेषानें)* ढीगभर वाटत असेल. करायची आहे काय असली वांझ माया ? *(पुन्हा येरझारा घालूं लागतो. तशांतच फणफणत दबलेल्या रागाच्या अस्फुट उद्रेकांतच—)* स्वतःला कोणत्याहि कलेबद्दल काडीमात्र प्रेम नाहीं... वडिलांच्या कीर्तीबद्दल आदर नाहीं...मुलाच्या पराक्रमाचं कौतुक नाहीं... दुसऱ्याच्या सुखदुःखाची तमा नाहीं...जगण्याच्या शुष्क वेडापलीकडं आत्म्याला

कसली ओढ नाहीं, कसली आंच नाहीं...

**दामोदरपंत :** कोणाबद्दल बोलतो आहेस तूं बापू?

**बापू :** कोणाबद्दल? *(जवळ जाऊन, एकदम क्रोधाचा स्फोट व्हावा तसें ओरडून)* दादा, दादा, दादा!

*(त्याच क्षणीं जिन्यांत आलेले दादा थबकतात. विस्मयानें ते तेथूनच प्रक्षुब्धतेनें बघूं लागतात.)*

**दामोदरपंत :** *(बापूचा क्रोध आवरण्यासाठी—समजावणीच्या स्वरांत)* बापू...बापू...

**बापू :** *(भानावर येत, विफलतेनें, विव्हलतेनें)* दादा...दादा...काका... *(मग पूर्ण भानावर आलेल्या बापला आपली चूक उमगते. कोणाचा राग आपण कोणावर काढला याचा अपराधीपणा जाणवतो. त्या प्रक्षोभांतच पण मृदु आर्त स्वरांत बेहोषीनें तो विचारतो—)* तुम्हांला गाणं ऐकायचंय् ना माझं काका? *(दामोदरपंत मानेनेंच होय म्हणतात.)* मग ऐका तर ही चीज. *(बापू भावपूर्ण स्वरांत भैरवीतील 'बाबुल मोरा' ही चीज म्हणूं लागतात. जिन्यांत उभे असलेल्या दादासाहेबांच्या मुखावर भराभरा भाव बदलतांना दिसूं लागतात. अखेर तर ते चीज ऐकण्यांत तल्लीन होतात. त्या तल्लीनतेंत पायऱ्या उतरून ते खालीं येतात. शेवटच्या पायरीवर त्यांचें पाऊल पडतांच...बापूची त्यांच्याकडे दृष्टि जाते. दादासाहेब नजरेला पडतांच तुकडा पडावा तसें त्याचें गाणें थांबतें. तो ताडकन् उठून उभा राहतो आणि पाठ वळवून बाहेर पडतो. या त्याच्या अकल्पित विचित्र वर्तनाचा बोध न होऊन दामोदरपंत विस्मयानें "बापू...अरे, कसा हा मुलगा तरी..." असें उद्गारत मागें न बघतांच त्याच्या पाठोपाठ जातात. या घटनेनें दादासाहेब कमालीचे घायाळ होतात. दुसऱ्या दारानें पंत आधींच येऊन हा प्रकार बघत उभे राहिले आहेत. त्यांना उद्देशून दादासाहेब विव्हलतेनें म्हणतात—)*

**दादासाहेब :** *(कष्टी मनानें)* कां? ही मंडळी निघून कां गेली? आमचं पाऊल दिवाणखान्यांत पडायच्या आधीच यांनीं आमच्याकडं पाठी वळवल्या. इतकं आमचं दर्शनदेखील नकोसं झालंय का घरांतल्या माणसांना

**पंत :** भलताच गैरसमज झालाय रावसाहेब आपला.

**दादा :** तर मग तुम्हीदेखील आमच्यावर उलटलेले दिसतां. तुम्हांलादेखील नव्या धन्याच्या पैशाचा मद चढलेला दिसतो. तो पोरगा मघां तसं बोलला, तुम्ही ही अशी तिढी भाषा करतां. ठीक आहे. चालू द्या. कंगाल झालों ना आम्ही? अरे, पण आम्ही कोणाच्या खस्ता खातां खातां कंगाल झालों याचा कांहीं विचार? हीं, हीं भावंडं इवलालीं होतीं तेव्हां त्यांना वाऱ्यावर सोडून आम्हांला गबर होतां आलं नसतं का? *(क्षणभरानें सुस्कारून)* पण त्याचंहि ठीकच आहे. आम्हीं काय केलं त्याच्यासाठीं? त्याच्या पंखांत झेंप घेण्याची शक्ति येण्यापूर्वीच आम्ही त्याला खरोखरीच निर्दयपणं वाऱ्यावर सोडलं. पण मग—*(थबकून क्षणभरानें)* पंत?

**पंत :** जी रावसाहेब?

**दादा :** त्याचा पलंग बाहेर गच्चीवर टाकलेला पाहिला आम्हीं मघां.

**पंत :** गैरसमज होतोय रावसाहेब हा आपला. उघड्यावर झोपायचीच आपल्याला संवय आहे असं ते म्हणाले म्हणून—

**दादा :** तो लाख म्हणेल. पण तुम्ही घरचीं जबाबदार माणसं आहांत ना? तुमच्या लक्षांत यायला नको? त्याच्या जिवावर चैनी करतां? पण त्याच्या प्रकृतीची काळजी कोणाला वाटत नाहीं. जो तो आपल्याच मस्तींत. आम्ही पाहतों आहोंत, आठ-पंधरा दिवस या कारखान्याच्या कामापायीं त्याचं धड खाण्यापिण्यांत लक्ष नाहीं. अशानं आजारी नाहीं का पडायचा तो?

**पंत :** सांगून ऐकलं तर पाहिजे ना माणसानं?

**दादा :** पोटांत जिवंत माया असली म्हणजे ऐकतात माणसं. तुमचे नुसते शब्दांचे पिसारे तेवढे पाहून घ्यावेत. आजच्या आज पलंग हलवा आणि बाहेरच्या माडींत आणून घाला.

**पंत :** पण रावसाहेब—

**दादा :** आम्हीं सांगितलंय म्हणून सांगा त्याला. आमच्या शब्दाबाहेर तो जायचा नाहीं. *(क्षणभर थांबून)* पण थांबा. आमच्या शब्दाची त्याला परवा बाळगायचं काय कारण? पण मग—*(पुन्हा थबकून)* पंत, एक गोष्ट विचारूं? इमानानं द्याल उत्तर?

**पंत** : अशा शब्दानं रावसाहेब आपण मला कां टोचतां? मीं माझं इमान कधीं सोडलंय?

**दादा** : तसं नव्हे. पैसा माणसाला वाटेल तें बोलायला शिकवतो.

**पंत** : पण मी पैशाला भुलून आपल्याशीं प्रतारणा करीन का ?

**दादा** : *(हलक्या आवाजात, कानोसा घेत)* मग खरं सांगा, हा...हा घरीं आला आहे तो दामूच का ?

**पंत** : *(विस्मयानें)* म्हणजे ?

**दादा** : का ? त्या त्या खुळ्याच्या बाबतींत कसा तडकाफडकीं निकाल लावून टाकलांत तुम्ही ?

**पंत** : *(विस्मयानें)* बरं मग ? मला अजून समजला नाही आपल्या बोलण्याचा रोख ?

**दादा** : नाहीं, त्यावेळीं तुम्हांला फेरविचार करायची देखील गरज वाटली नाही. एकाद्या झुरळाला झटकावा तसा झटकलांत तुम्हीं त्या बिचाऱ्याला. पैकेवाला नव्हता ना तो ? मग आमचं म्हणणं—याच्या बाबतींत कुठं गेल्या तुमच्या त्या शंकाकुशंका ?

**पंत** : *(चकित होऊन)* म्हणजे आपण म्हणतां आहांत तरी काय रावसाहेब ?

**दादा** : आम्हांला आपली दाट शंका आहे—

**पंत** : शंका कसली ? कोणी भलताच इसम दामूरावांचं नांव घेऊन या घरांत वावरतोय असं तर...

**दादा** : तेंच तेंच म्हणतोय मी. मोठ्यानं बोलू नका.

**पंत** : *(हसून)* छे छे, भलतंच काय कांहींतरी ? रावसाहेब असली विचित्र शंका आपल्याला आली तरी कशी ?

**दादा** : जरा विचार करा. घरांतून दामू पळाला तेव्हां फाटका कपडा देखील नव्हता त्याच्या अंगावर. ना धड शिक्षण, ना बाहेरच्या जगाचा अनुभव. मग कोठून मिळाला इतका पैका ?

**पंत** : दामूरावांची ब्रह्मदेशांतील कहाणी ऐकली नाहींत का तुम्ही ? कोठल्याशा व्यापाऱ्याबरोबर प्रथम नोकर म्हणून ते रंगूनला गेले आणि तेथें—

**दादा :** असलीं पुराणं आम्हांलादेखील रचतां येतात.

**पंत :** अहो, पण त्यांच्या चेहऱ्यामोहऱ्याची ठेवण जरी पाहिली—

**दादा :** चेहऱ्याच्या ठेवणीबद्दलच म्हणत असाल तर त्या खुळ्याच्या चेहऱ्यांत आणि पूर्वीच्या दामूच्या चेहऱ्यांतच जास्त साम्य होतं.

**पंत :** *(हसून)* हा आपला कांहीं तरी तर्क आहे झालं.

**दादा :** शिवाय माणसासारखीं माणसं पुष्कळ दिसतात. पण म्हणून—

**पंत :** अहो, या घरांत पूर्वी घडलेल्या हकीकती खडान् खडा सांगतांना तुम्हीं त्यांना ऐकलं नाहींत काय?

**दादा :** या गांवांतलं एकादं पोर देखील सांगूं शकेल त्या गोष्टी.

**पंत :** *(थक्क होत)* मग आपलं म्हणणं तरी काय? या घरांत दामूरावाचं सोंग घेऊन कोणी तरी तोतया वावरतो आहे कीं काय? *(हसतात.)*

**दादा :** हसूं नका. हसण्यावारी नेण्यासारखी गोष्ट नव्हे ही.

**पंत :** हसूं नको तर काय करूं. जें कोणाच्या ध्यानींमनींसुद्धां येणार नाहीं तें तुम्ही मला खरं माना म्हणून सांगूं लागलांत तर मी कसा विश्वास ठेवूं? कोणा वाटेच्या वाटसराला उगाच या कुटुंबाच्या कल्याणासाठीं असा पाण्यासारखा पैसा खर्च करायची काय गरज?

**दादा :** *(वरमून)* मग आमचाच तर्क चुकला म्हणायचा?

**पंत :** चुकला म्हणजे? अगदीं साफ चुकला. रावसाहेब, आपण असं मनांत देखील आणूं नका.

**दादा :** *(एकदम क्रुद्ध होऊन पंतांच्याकडे डोळे वटारून बघतात. त्यामुळें पंतांची गाळण उडते.)* कोणाशीं भाषा करतां आहांत पंत?

**पंत :** *(घाबरून)* नाहीं...त...पण...

**दादा :** *(क्रोध आवरून)* पंत अलिकडं माझ्याशीं तुम्ही आपली पायरी सोडून वागतां आहांत.

**पंत :** *(घाबरून)* काय चुकलं माझ्याकडून रावसाहेब?

**दादा :** खुशाल आमच्या तोंडावर आमचं चुकलं म्हणून सांगतांना तुम्हांला

शरम नाहीं वाटत? *(पंत चेहरा टाकून उभे राहतात. मग कांहींतरी कुरापत काढायची म्हणून; दरडावीत)* बावड्याच्या सावकारांना उत्तर घातलंत आम्हीं सांगितलं होतं त्याप्रमाणं?

**पंत** : *(चाचरत)* मला वाटलं...म्हणजे...

**दादा** : *(उसळून)* आम्ही विचारतों आहोंत---पत्र गेलं कीं नाहीं? प्रश्नाचं सरळ उत्तर द्या.

**पंत** : वहिनीसाहेबांना आपण एकदा विचारणार असाल म्हणून---

**दादा** : पत्र अजून गेलं नाहीं, असंच ना? *(क्षणभर रागानें पंतांच्याकडे रोखून बघतात. पंतांची चांगलीच घाबरगुंडी उडते. पण राग मावळतो आणि दादांची मुद्रा करुण होते.)* पंत, तुमच्या डोक्यांतदेखील अजून पुरता प्रकाश पडूं नये याचं आम्हांला आश्चर्य वाटतं. बापूप्रमाणं ती पोर वाऱ्यावर उधळली म्हणजे मग का लगाम खेचत बसणार आहां? खानदानीच्या मणा-मणाच्या वेड्या पायांत अडकवल्याखेरीज ठाकुरांच्या घराण्यांतील माणसांचीं उडगारीं मनं जमिनीवर टिकून राहायचीं नाहींत. पंत, पूर्ण विचारानंच आम्हीं शकूच्या लग्नाचा निर्णय घेतला आहे, समजलांत.

**पंत** : तें खरं. पण एकदा वहिनीसाहेबांना विचारून त्यांचा सल्ला आपण घेतला असतात म्हणजे---

**दादा** : *(भडकून)* आम्ही कोणाला विचारीत बसत नाहीं. आम्हांला कोणाशीं सल्लामसलत करीत बसायची संवय नाहीं. आम्ही या घराचे, या घरांतल्या माणसांचे, तुमचे देखील आम्ही मालक आहोंत मालक! समजलांत?

**पंत** : तसं नव्हे रावसाहेब---

**दादा** : जा, शकूच्या आईला आणि शकूला बोलावून आणा आमच्या समोर. ताबडतोब दरबारांत हजर करा त्यांना. या प्रश्नांचा सोक्षमोक्ष आम्हांला एकदा केलाच पाहिजे. एका राज्यांत दोन स्वामी नांदूं शकत नाहींत. जा, जा म्हणतों ना---*(पंत घाबरून आंत पळतात.)* माणसांचे छंद, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांच्या लहरी फारच माजल्या आहेत आतांशा.) *पार्श्वसंगीत सुरू होतें. प्रकाश बदलतो. हिरव्या प्रकाशाचा झोत पडतो. दादासाहेब कावरेबावरे होत सभोंवतालीं विचित्रासारखे बघूं लागतात. दिवाणखान्यांतील प्रत्येक लाकडी सामान*

*खुर्ची, टेबल, टीपॉय, कपाट ते चाचपून पाहूं लागतात. आणि हें करतांना—)* दाम्या, सारंच फसलं! अरे, या टेबलाकडे, या खुर्चीकडे, या कपाटाकडे पाहिलंस का तरी? बघ बघ, जरा—अरे, या खुर्चीतून हिरवे हिरवे कोंब डोकावूं लागले आहेत. या टेबलाला पालवी फुटली आहे. आणि या कपाटाला बघ कसे हिरवेगार तुरे लटकले आहेत. *(खळखळून हसतात.)* फजीती! सपशेल फजीती झाली. बसा आतां ओरडत. या लाकडावर रंधा मारमारून किती बरं गुळगुळीत केले होते? वर मारे रंगरंगोटी केली. मोठे सुबक आकार दिले. पण लाकूड तें लाकूड! अरे, रंध्यानं घासलं आणि वर रंग फासले म्हणून लाकूड कधीं मरेल का? अरे जमिनीला पाय टेकतांच आपल्या पोटांतून हीं हिरवीं पिशाच्चं पाहा कशीं उपसलीं या गुलामांनीं. *(पुन्हा खळखळून हसतात.)* दाम्या, तुला गंमत सांगूं का? आं? अरे इकडं कान कर असा. मोठ्यानं बोलायच्या गोष्टी नव्हेत या. घराण्याचीं छिद्रं अशीं कोणी चव्हाट्यावर का सांगतो? ऐक, मी सांगतों ती गंमत. या लाकडाच्या सगळ्या वस्तू, हीं खिडक्यादारं सुद्धां, बरं का, आतां इथं जंगल माजवणार जंगल! हिरवंगार जंगल. *(गंभीरपणें चुकचुकत)* छे छे, दाम्या, गड्या हें नाहीं उपयोगी. असं नाहीं चालणार. सुरेख दिसलीं म्हणून काय झालं? खुर्चीला आणि टेबलाला का कोठें पालवी फुटते? तें कांहीं नाहीं. फिर्यादच केली पाहिजे. कोणाकडं म्हणजे? देवाकडं. देव नसला तर त्याचा जो कोण प्रतिनिधि असेल त्याच्याकडं नेऊं ही फिर्याद. हो, आपल्याला भ्यायचं काय कारण? रास्त आहे आपली तक्रार. असला कसला चावटपणा! रंधा मारलेल्या टेबलाला आणि खुर्चीला मुळीं पालवी फुटायचा अधिकारच नाहीं. ही पालवी, तुरे, हे कोंब एकजात बेकायदेशीर आहेत. निसर्गाकडून देखील नुकसानभरपाई मागितली पाहिजे. निसर्ग झाला म्हणून काय झालं? जाळून पोळून खणून काढला पाहिजे, असला चावट निसर्ग...

*(खपूकन् पार्श्वसंगीत तुटतें. बांसरीचे स्वर थांबतात. अंधार होतो. पुन्हा प्रकाशानें रंगभूमी उजळते, त्यावेळीं दादासाहेब सांवरून बसलेले असतात. भानावर येऊन डोक्याला हात लावतात आणि आजूबाजूला न्याहाळून बघतात. बहुधा सभोंवतालच्या लाकडी वस्तूंना खरोखरीच पालवी फुटलेली नाहीं ना, याची त्यांनीं खात्री करून घेतली असावी. तोंच समोर जीजी, शकू आणि पंत येऊन उभे राहातात.)*

**जीजी** : कांहीं काम होतं का ?

**दादा** : होय. *(क्षणभरानें निश्चयानं)* आम्हीं शकूचं ठरविलं आहे.

**जीजी** : *(विस्मयानें)* काय म्हणालांत ?

**दादा** : *(चिडून)* उगाच "काय काय" करूं नका. नीट मस्तक शुद्धीवर ठेवून ऐका. आम्हीं शकूचं लग्न करायचं ठरवलंय्. बावड्याच्या सावकारांनीं शकूला मागणी घातलीय. आपण होऊन चालून आलंय् हें स्थळ.

**शकू** : *(किंचाळत)* सावकारांनीं ? आई ग.

**दादा** : उगाच किंचाळायला काय झालं ? सावकारांचं स्थळ उत्तम स्थळ आहे. तुमच्या आवडीनिवडीचं बंड फारच माजलंय. रंधा मारून सगळ्या आवडी-निवडी पार भुंड्या करून टाकणार आहोंत आम्ही आज.

**जीजी** : सावकार केवढे, ही केवढी याचा कांहीं विचार ? मागणी घालणाराला सुद्धां लाज वाटायला पाहिजे.

**दादा** : सगळा विचार करायचा तो केला आहे आम्ही. चाळींशीच्या आंतबाहेर म्हणजे कांहीं म्हातारपण तर झालं नाहीं ना ? सावकारांच्यासारखं खानदानीचं स्थळ मागून मिळायचं नाहीं. त्यांनीं आपण होऊन मागणी घातली म्हणून मस्ती आली होय तुम्हांला ? बापूचा प्रकार पुन्हा घडावा याची वाट बघतां आहांत काय तुम्ही ? या पोरीला अक्कल फुटायच्या आंत खानदानी घराण्यांत तिला अडकवून टाकली पाहिजे.

**जीजी** : नुसत्या खानदानीकडे बघून कसं चालेल ?

**दादा** : सावकारांनीं आपल्या पडत्या काळांत आपल्याला सावरलं आहें हें इतक्यांतच विसरलांत का ?

**जीजी** : म्हणून या अशा रीतीनें त्याची परतफेड करणार आहात वाटतं ? आणि मदत कसली ? कर्जाऊ तर पैसे दिले. चांगलं चोपून व्याज घेत होते. भावोजी दामदुपटीनं त्यांचे पैसे परत करणार आहेत.

**दादा** : *(उसळून)* त्याच्या पैशानें सावकारांचे उपकार फेडतां काय ? नको आहेत त्याचे पैसे आम्हांला. अशा थाटांत हिचं लग्न करणार आहोंत आम्ही कीं तें बघून दामूचेदेखील डोळे दिपले पाहिजेत. कारखान्याचा समारंभ करतो आहे म्हणे.

**जीजी :** छान ! भावोजींचे डोळे दिपविण्यासाठीं का शकूचं लग्न करायचं आहे ?

**शकू :** पण हा वाद कशाला जीजी ? मला मुळीं इतक्यांत लग्नच करायचं नाहीं.

**दादा :** *(भडकून)* काय काय म्हणालीस ? पुन्हा बोल ते शब्द ? थोबाड फोडून टाकतों कीं नाहीं तें बघ. त्याच्या पैशावर तुझीसुद्धां जीभ चुरुचुरु करायला लागली काय ?

**जीजी :** तिच्यावर कां रागावता उगीच ? तिचा काय अपराध आहे त्यांत ?

**दादा :** अपराध तिचा नाहीं, तुमचा नाहीं, आमचाच आहे, समजलांत ? माणसं मायेच्या पोटीं सैल सोडलीं आजवर म्हणून ही असली उलटी भाषा ऐकावी लागते आहे आज आम्हांला. तें कांहीं नाहीं. आमचा शब्द म्हणजे शब्द ! त्याची ताबिली बिनतक्रार झालीच पाहिजे !

**जीजी :** पण भावोजींचा सल्ला घेतलांत का एकदा ? त्यांनीं एवढ्या हौशीनं हिला शिकवायचा घाट घातलाय् आणि—

**दादा :** त्याचा सल्ला काय म्हणून ? तो कोण ? घराचा मालक कोण ? या पोरीचा मालक कोण ? आमच्या पोराबाळांच्यावरहि आमचा अधिकार नाहींसा झाला कीं काय ?

*(तेवढ्यांत दामोदरपंत प्रवेशतात आणि—)*

**दामोदरपंत :** *(शांत लाघवीपणें)* पण यांत अधिकाराचा काय प्रश्न आहे दादा ? अजून कांहीं तिचं लग्नाचं वय होऊन गेलं नाहीं.

**दादा :** तें ठरवायचं कोणीं ? तूं...तुम्हीं...तुम्हीं का आम्हीं ?

**दामोदरपंत :** ठरविण्याचा यांत कांहीं संबंधच येत नाहीं. सावकारांचं स्थळ तिच्या तोलाचं तरी आहे का ?

**दादा :** *(तीव्र कुत्सितपणें)* तें तुला काय कळणार आहे ? तुझी संस्कृति तसलीच. बोलून चालून तूं नायकिणीच्या पोटचा बेवारशी पोर—

**जीजी :** हां हां—? काय ही भाषा ? कोणाशीं आपण बोलतों आहोंत त्याचा कांही विचार ? निदान मुलाबाळांच्या समोर तरी—

**दामोदरपंत :** *(व्यथित होऊन)* नका वहिनी, नका रागावूं तुम्ही दादांना.

मी सहा महिन्याचा होतों तेव्हां या घरांत आणून दादांनींच मला पोटच्या मुला-पेक्षांहि अधिक मायेनं वाढवलं.

**दादा :** *(ओरडून)* तो दामू आम्हांला मेला. त्याचं नांव देखील घेऊं नकोस.

**दामोदरपंत :** घरांतून पळून जाऊन मीं त्यांचा अपराध केला आहे. मला असले तीव्र शब्द बोलायचा त्यांना अधिकारच आहे. ते बोलतील तें मला सहन केलंच पाहिजे.

**दादा :** सहन करशील नाहीं तर काय? आम्ही खोटं बोलतां आहोंत थोडेच? त्या बापूची ती तशी अवस्था करून टाकलीस, आतां या पोरीलादेखील एकाद्या लेकावळ्याच्या गळ्यांत बांधून टाक म्हणजे डोळे निवतील तुझे.

**दामोदरपंत :** काय बोलतां आहांत हें आपण दादा?

**दादा :** तुझा उन्मत्तपणा अम्ही पूर्ण ओळखून आहोंत म्हटलं वच्चंजी.

**दामोदरपंत :** कोणता उन्मत्तपणा केला मीं दादा?

**दादा :** पैसा मिळवला तरी नायकिणीची संस्कृति थोडीच मावळते?

**दामोदरपंत :** दादा माझ्या जन्माचा मी मालक का होतों? आणि अनौरस-पणाचा शिक्का माझ्या कपाळीं बसला म्हणून काय या मुलांच्या आयुष्याची मी असली माती करीन? काय केली मीं बापूची अवस्था? त्याचं लग्न तर मीं करून दिलं नाहीं ना?

**दादा :** त्याला राजरोस घरांत आणलास हें काय कमी केलंस?

**दामोदरपंत :** नुसता घरांत नव्हे, मीं त्याला माणसांत आणला. काय बिघडलं त्यांत? एका अपराधासाठीं बापूला आयुष्यांतून उठवायचा का विचार होता तुमचा?

**दादा :** माझा विचार काय होता तें तुझ्यासारख्या बेवारशी पोराला सात जन्म घेऊनदेखील समजायचं नाहीं.

**दामोदरपंत :** मघांपासून दोन वेळां ऐकला तो शब्द! दादा, माझ्यासारख्या बेवारशी पोराचं अंतःकरण कळायला एक जन्महि पुरेल. पण तो तुम्हाला माझ्या आईच्या पोटीं घ्यावा लागेल.

**दादा :** काय म्हणालास ?

**दामोदरपंत :** बेवारशी म्हणून तुम्हीं मला हिणवलंत. पण खरं सांगूं दादा, रागावूं नका, पण माणुसकी दाखवली तर माझ्यासारखीं बेवारशी मुलंच ती दाखवूं शकतील. तुमच्या खानदानीच्या वेडानं मात्र माणसांचीं जनावरं करून टाकलीं होतीं या घरांत.

**दादा :** *(क्रोधाचा प्रळय होऊन, थरथरत उठत)* चुप बैस! वर तोंड करून कोणाला बोलतोस ? आमचा अपमान करतोस ? आमचा अधिकार बळकावतोस ? आमचीं बायकामुलं फितवतोस ? *(एकदम झडप घालीत छडी उचलून)* काय समजला आहेस तूं ? तुला आम्ही अजून फोडून काढूं. अजून चामडी लोळवूं अंगाची. याद राख. कसली मस्ती चढली आहे ? पैशाची ? कसला माज आला आहे ? अधिकाराचा ?

*(असें म्हणत दादासाहेब दामोदरपंतांच्या अंगावर धांवून जातात. त्यांना मारण्यासाठीं छडी उगारतात. पण तितक्याच शांतपणें दामोदरपंत एक एक पाऊल पुढें येतात.)*

**दामोदरपंत :** मारा ! तुमची इच्छाच असेल तर मारा ! एकदा नव्हे अनेकदा मारा ! हात दुखेपर्यंत मारा, छडी मोडेपर्यंत मारा. दादा, तुमच्या क्रोधाची तृप्ति होईपर्यंत मारा. दादा, पूर्वी त्या छोट्या दामूला मारलंत तसंच आज या मोठ्या दामूला मारा.

**दादा :** *(दचकतात. मागें मागें सरतात. हात तसाच वरचेवर राहतो. मग एकदम विकलतेनें)* काय ? काय म्हणालास ? पूर्वी मारलं तसं ? पूर्वी मारलं तस्स ? *(बांसरीचा स्वर ऐकूं येऊं लागतो. दादासाहेबांची मुद्रा वेडीवाकडी होऊं लागते.)* पुन्हा आम्ही मारूं ? पुन्हा तुला देशोधडीला लावूं...? पुन्हा...पुन्हा... आई...बडेभय्या...*(बांसरीचे स्वर गतिमान होतात. दादासाहेबांचा छडीचा हात ओघळतो. मुद्रा वाकडी होऊं लागते. डोळ्यांतली धिटाई ओसरून बुबुळें भित्र्याप्रमाणें सैरावैरा पळूं लागतात. शरीरांतला ताठरपणा मेणाचा पुतळा विरघळून ओघळावा तसा ओघळूं लागतो. सारें शरीर थरथर कांपूं लागतें. ओठ थरथरूं लागतात. तोंडांतन लाळ गळूं लागते. आणि बघतां बघतां दादासाहेब खुळ्या दामूप्रमाणें हातवारे करीत एकदम उमसून रडत*

*दामोदरपंतांच्या पायावर लोळण घेतात. या अकल्पित घटनेनें सगळींच माणसें कावरींबावरीं होतात, तोंच—)*

**दादा :** *(स्फुंदून रडत)* मारूं नका हो, मारूं नका...

**दामोदरपंत :** हें काय, हें काय दादा ?

**दादा :** मारूं नका...मारूं नका...मारूं नका हो मारूं नका...वाटल्यास घर सोडतों, पण मारूं नका...

**दामोदरपंत :** *(भांबावून)* तुम्हांला कोण मारतोय दादा ? उठा उठा, असं काय करतां दादा ! दादा...दादा...काय झालं तुम्हांला ?

**दादा :** नाहीं मारणार ? नाहीं ? खरंच नाहीं ? अगदीं खरं ? बांसरीशपथ खरं ? नाहीं मला घालवून देणार ? नाहीं माझं घर उन्हांत बांधणार ? *(एकदम खदाखदा हसत सुटतात. तें हसणें ऐकून आंतून बापू, चंदू धावत येतात. चकित होऊन थिजलल्या मुद्रेनें सगळींच माणसें दादासाहेबांच्याकडे बघूं लागतात तोंच)*

**दादा :** *(धोतराच्या सोग्याची झोळी करीत खुळ्या दामूप्रमाणेंच वेडेंवाकडें नाचत गात 'गरिबाला पैसा दे भगवान—' (असें गात पटकन् धावत ज्या खिडकींतून प्रथम दामू आला होता त्याच खिडकींतून उडी मारून पसार होतात.)*

**दामोदरपंत :** *(मागोमाग धावत)* दादा...दादा...*(जीजी, बापू, चंदू, पंत सगळींच घाबरून वज्राघात झाल्यासारखे तशींच उभीं आहेत आणि रंगभूमीवर फक्त बांसरीचे स्वर उरलेले आहेत. बांसरी वाजत असतांच—)*

**पडदा**